# नवभारत

वर्ष ४ थें ]     मार्च १९५१     [ अंक ६ वा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# नवभारत



## या अंकांतील जाहिराती








# वर्गणीदारास सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याचद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
टिळक रोड, पुणें २

# जाहिरातींचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ " | ४० " | २५ " |
| बारा वेळां | ६० " | ३५ " | २० " |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | " " | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें
अंक सहावा

# नवभारत

मार्च
१९५१

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरिता तेथेंच प्रसिद्ध केलें.

---

# संपादकीय

## कृतज्ञतापूर्वक स्वीकार—आणि विनंति

'नवभारता'ची उपयुक्तता व त्याला असलेली द्रव्यसाहाय्याची आवश्यकता जाणून एका वाचक-भगिनीनें उत्स्फूर्तपणें वर्गणीव्यतिरिक्त अधिक रक्कम देणगी म्हणून पाठवून जी 'नवभारता'ला शुभेच्छा व्यक्त केली होती, तिचा निर्देश व साभार स्वीकार 'नवभारता'च्या डिसेंबर १९५० च्या अंकांत केला आहेच. या उपक्रमाचें स्वागत करून, त्याच ठिकाणीं आम्ही 'नवभारता'च्या वाचकांना अशी विनंति केली होती कीं, "वाचकांनीं ९ रु. वर्गणीव्यतिरिक्तहि 'नवभारता'ला साहाय्य करावें."

त्या आमच्या विनंतीस मान देऊन ज्या वर्गणीदार वाचकांनीं देणगी पाठविली आहे, त्यांचा आम्ही कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों :

| | | |
|---|---|---|
| १ | कार्यवाह मराठी मंडळ, धारवाड | १ रु. |
| २ | श्री. स. गो. सोनपेठकर, मोमिनाबाद | १ रु. |
| ३ | श्री. के. ना. दुधाने, गडचिरोली | १ रु. |
| ४ | ,, पु. ह. पटवर्धन, मुंबई | १ रु. |
| ५ | ,, एम्. एस्. नायक, वसई रोड | १ रु. |
| ६ | श्री. पंढरीनाथ ब. रेगे, मुंबई | १ रु. |
| ७ | ,, व्ही. आर्. शिरोडकर | ३ रु. |
| ८ | 'अनामिक' | १० रु. |
| ९ | ,, | १० रु. |

'नवभारता'स द्रव्यसाहाय्याची आवश्यकता आहे. तेव्हां वाचकांस विनंति कीं, त्यांनीं स्वतः ९ रु. वार्षिक वर्गणीव्यतिरिक्तहि 'नवभारता'स द्रव्यसाहाय्य करावें; तसेंच आपल्या परिचित संस्था व व्यक्ती यांच्याकडून तें मिळवून द्यावें. अशा द्रव्यसाहाय्याचा आम्ही कृतज्ञतापूर्वक निर्देश आनंदानें करूं.

## 'नवभारता'ची पृष्ठसंख्या

'नवभारता'च्या दर अंकास आम्ही आतां-पर्यंत ७२ पानें देत आलों आहोंत. परंतु कागदांचे भाव खूप वाढल्यामुळें, या मार्चच्या अंकापासून ही पृष्ठसंख्या कमी करणें, ७२ पानांऐवजीं ६४ पानें देणें आम्हांस भाग पडत आहे, याचें वाईट वाटतें. वाचक-ग्राहकांनीं या आमच्या असामर्थ्याबद्दल क्षमा करावी.

---

# लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख 'नवभारतां'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

प्रा. दु. का. संत— रत्नागिरीच्या 'र. प. गोगटे कॉलेज' मध्यें मराठीचे प्राध्यापक. 'साहित्य आणि संस्कृति' या पुस्तकाचे लेखक.

श्री. ना. गो. चापेकर (बदलापूर)—सुप्रसिद्ध विचारवंत साहित्यिक आणि समाजशास्त्रज्ञ. 'आमचा गांव', 'समाज-नियंत्रण', 'वैदिक निबंध' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

श्री. वसंत हेवळे (अहमदाबाद)—'पुष्करिणी' या कवितासंग्रहाचे कर्ते. यांची 'शिवांगी' ही नाटिका प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

प्रा. य. का. सोहनी—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें फ्रेंचचे प्राध्यापक. यांचें 'सुरस फ्रेंच कथा' हें पुस्तक नुकतेंच गेल्या डिसेंबरमध्यें प्रसिद्ध झालें.

अनुक्रमणिका

प्रा. दु. का. संत

# धर्मातीत राज्य

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपल्यापुढें कांहीं महत्वाचे प्रश्न निर्माण झालेले आहेत. आपण गेल्या तीन वर्षांत आपली घटना निश्चित केलेली आहे. त्या घटनेंतील एक महत्त्वाचा-आणि प्रगतिशील दृष्टीनें विचार करणारांना अत्यंत महत्त्वाचा, असा भाग म्हणजे धर्मातित राज्याच्या ध्येयासंबंधींचा होय. घटनेप्रमाणें या ठिकाणचें राज्य यापुढें धर्मातीत (Secular) राहणार आहे. लोकशाही राज्यव्यवस्था मान्य केल्यानंतर धर्मातीत राज्य हा अपरिहार्य पर्याय होतो. आणि अर्थातच ज्यांना लोकशाही मान्य आहे त्यांना धर्मातीत राज्य तत्त्वतः मान्य व्हावयास हरकत नाही; निदान त्यांना विरोध करतां येणार नाहीं. आस्थेनें व व्यापक दृष्टीनें पाहाणारांस धर्मातीत राज्याचें ध्येय आकर्षक वाटावें इतकें भव्य आहे. आपल्या कालाचा तो एक मोठा विचार आहे. एवढ्या मोठ्या विचाराबाबत लोकांच्या माहितीच्या दृष्टीनें जी चर्चा--चिकित्सा व्हावयास पाहिजे ती झालेली नाहीं. त्यामुळें त्या बाबतींत बहुसंख्य लोक अज्ञानांतच आहेत. त्यांचा कौल थोडा विरोधीच पडेल. लोकशाही मूल्यांच्या दृष्टीनें धर्मातीत राज्य हें कसें आदर्श, भव्य, अपरिहार्य आणि व्यवहार्य आहे, याचें या ठिकाणीं दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

मानवी समाजव्यवस्थेच्या उत्क्रांतीचें अवलोकन केलें असतां असें आढळून येतें कीं, साधारणपणें तीन अवस्थांनीं याबाबतची प्रगति झालेली आहे. आज आपल्या कालाची समाजव्यवस्थेची पद्धति म्हणजे लोकसत्ता. लोकसत्तेचा विचार हा केवळ राजकीय व्यवहार वा परिस्थिति यांपुरतांच मर्यादित आहे असें समजून चालणें चूक होईल. परंतु आतांपावेतों राजकीय क्षेत्रांतील लोकसत्तेचाच उदोउदो झालेला आहे. जीवनाच्या वेगळ्यावेगळ्या क्षेत्रांत तिचा समावेश व्हावयास हवा, हा विचार अद्यापि रूढ व्हावयाचा आहे. आपल्या कालाचें जीवन हें लोकसत्तेनें अंकित केलेलें आहे, असें म्हणतां येईल. या लोकसत्तेपूर्वीं समाजव्यवस्थेवर राजसत्तेचें प्रभुत्व होतें आणि तो काळहि इतिहासांत बराच दीर्घ आहे. यापूर्वीं समाजजीवनाचें सर्वांगीण नियंत्रण धर्मसत्तेनें केलेलें आहे. राजसत्ता ही एक प्रकारें संक्रमणावस्था म्हणतां येईल. लोकसत्तेचीं स्वतःचीं अशीं मूल्यें निर्माण होत आहेत; होत आलेलीं आहेत. समता, मानवता, बुद्धिवाद हीं तीन त्यांतल्या त्यांत महत्त्वाचीं आहेत. राजसत्तेला स्वतःचीं अशीं मूल्यें नव्हतीं. धर्मप्रणीत मूल्येंच राजसत्तेनें परिपालिलीं आहेत. त्यामुळें लोकजीवनाच्या नियंत्रणामागें असलेल्या मूल्यांचा जेव्हां आपण विचार करूं शकतों तेव्हां धर्मसत्तेला अभिप्रेत असणारीं मूल्यें, व लोकसत्तेला अभिप्रेत असणारीं, असे दोन गट प्रामुख्यानें कल्पावे लागतात. साहजिकपणें राज्याच्या व्यवस्थेचा विचार करतांना त्या राज्यव्यस्थेमागें किंवा समाजव्यवस्थेमागें कोणतीं मूल्यें आहेत तें विचारांत घ्यावें लागतें. आणि मग अर्थातच धर्मानें पुरस्कारिलेल्या निष्ठा व लोकसत्ता पुरस्कारीत असलेल्या निष्ठा असे दोन महत्त्वाचे गट विचारांत घ्यावे लागतात. सेक्युलर ह्या शब्दास ‘ धर्मातीत ’ हा जो शब्द येथें वापरला आहे तो ह्याच दृष्टीनें. धर्मनिष्ठ व धर्माच्या अतीत असणारे असे दोन स्पष्ट पर्याय संभवतात. राजा ही संस्था खरोखरच ऐतिहासिक दृष्ट्या फार गंमतीची आहे. आणि त्यामुळेंच राजसत्तेचें स्वरूप एकजिनसी न आढळतां बहुजिनसी आढळतें. तो खरोखरच ‘ चिवट ’ प्राणी आहे असें म्हणावें लागतें. आपण

अनुक्रमणिका

( निदान मराठींत तरी ) लोकसत्तात्मक ' राज्य ' असा राजसंबद्ध शब्दच उपयोगांत आणतों. त्याऐवजीं, खरें सांगावयाचें तर, ' लौक्य ' हा शब्द रिपब्लिक'ला प्रतिशब्द म्हणून रूढ व्हावयास हवा. त्याचें अधिकांत अधिक संस्कृत मान्यरूप ' लौक्य ' असें होईल. व तो अन्वर्थक नि सुटसुटीतहि होईल.

## आधुनिक युगाचें वैशिष्ट्य

लोकशाहीचा खरा आशय म्हणजे सर्व लोकांचें राज्य असा आहे. तथापि व्यवहाराच्या दृष्टीनें सर्व लोकांचें राज्य शक्यतेच्या पलीकडचें वाटतें. आणि मग लोकशाही म्हणजे बहुसंख्यांचें राज्य असा पर्याय मान्य झालेला दिसून येतो. ही ' बहुसंख्या ' ठरविण्यासाठीं, धर्म, भाषा, परंपरा इत्यादि गमकें जशीं पुढें येतात तसें दारिद्र्य हेंहि पुढें येतें, हें लक्षांत घ्यावयास हवें.

प्रत्येक व्यक्तीच्या कुलपरंपरा व संस्कार वेगळे असले तरी समाजाच्या परंपरा, ध्येयें, मूल्यें, इत्यादींचा व्यक्तीच्या मनावर व जीवनावर खोल परिणाम जाणतां वा अजाणतां होतो. राष्ट्रीय विचारांचें व राष्ट्रांचें पण तसेंच आहे. आज आपल्या युगांत लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य हीं मूल्यें सर्वमान्य म्हणून गणलीं गेलीं आहेत. आणि त्यांना अवलंबून राज्यपद्धति वा घटना ही असावयास हवी असा बंधनवजा संकेत आज सर्वत्र रूढ आहे. सर्व राष्ट्रांच्या घटना ह्या कसोटीस उतराव्यात असा विचार मान्य आहे. व अधिकाधिक प्रमाणांत आम्ही ह्या घटनांचें परिपालन करतों असा जगांतील प्रमुख-नि सर्वच-राष्ट्रांचा दावा आहे. कोणत्याहि नव्या राष्ट्रास आपल्या स्वतःच्या भवितव्याचा विचार करतांना ह्या मूल्यांबाबत बेफिकीर राहून चालावयाचें नाहीं. साहजिकपणें आपल्याहि राष्ट्रावर ह्या युगाच्या ध्येयांचा परिणाम होणें, हें क्रमप्राप्त व साहजिक आहे. हीं युगाला संमत असलेलीं ध्येयेंच जर कोणा एका राष्ट्राला वा गटास मान्य नसलीं तरीहि त्याला ह्या विचारांना मिळत असलेलें प्रामाण्य व मोठेपण लक्षांत घेऊन आपल्या अंतरंगांतील हेतूंना ह्या ध्येयांचा मुलामा देणें, हें अपरिहार्य होणार आहे. आपल्या राज्यकर्त्यांचा व विचारवंतांचा या ध्येयांवर अढळ विश्वास आहे, ही चांगली गोष्ट आहे आणि ह्या विश्वासाच्या योगानेंच लोकशाहीला अत्यंत जवळचें असणारें असें धर्मातीत राज्य आपण मान्य केलें आहे. तें आपल्या लोकशाहीच्या निष्ठेच्या दृष्टीनें अत्यंत परिपोषक अशी गोष्ट आहे. आजच्या युगांतलीं सर्वच राष्ट्रें हीं मोठ्या प्रमाणांत मानववादी आहेत. तीं ' राष्ट्रीय ' असलीं तरी मानवतावादास जवळचीं आहेत. तेव्हां राष्ट्रीय पुनर्रचनेच्या दृष्टीनेंहि धर्मातीत राज्य हेंच अपरिहार्य ठरतें. आपल्या कालांतल्या विचारांची अधिकाधिक मजल येथपर्यंत आलेली आहे. व ती आपण गांठलीच पाहिजे. आपली वैचारिक प्रगति तेथपर्यंत झालेली नाहीं म्हणून तें नको, हें म्हणणें चूक आहे. या युगाच्या रेल्वे, विमानें, यंत्रें इ. यांत्रिक सुधारणा ज्याप्रमाणें एकदम पूर्णावस्थेंतच आपणांस स्वीकाराव्या लागतात, तशीच वस्तुस्थिति ह्या विचारांबाबतची आहे. आजचीं सगळीं राष्ट्रें हीं विचार व ध्येय ह्या बाबतींत धर्मातीत आहेत आणि धर्म, मत, वंश, रंग इत्यादि निर्माण होणाऱ्या भेदांमुळें कोणाहि माणसाला शिक्षा अगर अन्याय होऊं नये, त्याचा मूलभूत हक्क अमान्य केला जाऊं नये, या गोष्टींबाबत प्रयत्न चालू आहेत, हें पण ध्यानांत धरणें आवश्यक आहे. यावरून केवळ विद्यमान परिस्थिति व तिचा ओघ लक्षांत घेतां धर्मातीत राज्य हेंच उच्च असें राज्ययंत्र होऊं शकतें, हें उघड आहे.

## धर्मातीतत्व ' राष्ट्रीयत्वा'शीं विरोधी नाहीं

परंतु धर्मातीत झालें तरी ' राष्ट्रीय राज्य ' असावयास हवें, हें म्हणणें योग्य आहे. आजचीं राष्ट्रें हीं विचारांच्या दृष्टीनें मानववादी आहेत. स्वरूपाच्या दृष्टीनें तीं राष्ट्रीय आहेत. तेव्हां त्या अवस्थेप्रत तरी आपण यावयास हवें, असा आग्रह धरणें, हेंहि पण योग्य आहे. आणि त्याप्रमाणें आपलें स्वतःचें असें राष्ट्रीयत्व विकसित करण्याची इच्छा करणें हें चूक नाहीं. तथापि, ह्या तथाकथित 'राष्ट्रीयत्वा'चा व धर्मातीतत्वाचा विरोध आहे असें गृहीत धरलें जातें, तें मात्र पूर्णपणें चूक आहे.

राष्ट्रीयत्व म्हणजे काय ? याबाबत विचार करूं लागलें तर निरनिराळे पर्याय पुढें येऊं लागतात. साधारणपणें आपल्या राष्ट्रावर प्रेम करणें व त्याच्या








सेवेंत आपलें जीवन आणि कर्तृत्व घालविणें याला रूढ अर्थानें राष्ट्रीयत्व म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि, राष्ट्राची सेवा कोणत्या मार्गानें अधिकाधिक होऊं शकते, कोणते विचार ह्याबाबत महत्त्वाचे आहेत, यासंबंधीं खूप मतभेद झालेले आहेत. त्यांत पुढील विचारसरणी प्रामुख्यानें पुढें आलेल्या आहेत : १ सांस्कृतिक राष्ट्राभिमान २ बुद्धिवादित्व ३ उदारमतवादित्व ४ समाजवादित्व ५ मानवतावादित्व. हे प्रमुख विचार आज आहेत. बुद्धिनिष्ठ दृष्टीनें पाहतां हे सर्व पर्याय राष्ट्राच्या सर्वांगीण प्रगतीस कमीअधिक प्रमाणांत परिपोषक आहेत. तथापि व्यक्तिगत दृष्टीनें पाहातां त्यांपैकीं कोणत्या तरी एकाविषयीं वा दोनींविषयीं अधिक आकर्षण वाटणें शक्य आहे. हे विचारहि एकदेशीय आहेत, असें म्हणतां येत नाहीं.

राष्ट्रीयत्वाची वाढ ही जगांत गेल्या चारशें वर्षांत झालेली आहे. आपणांकडे ते विचार गेल्या ७०।८० वर्षांतच वर्धमान झालेले आहेत. समाजांत या औद्योगिक क्रांतीच्या अनुषंगानें निर्माण झालेल्या मध्यमवर्गाला जें नवें सामर्थ्य उपलब्ध झालें त्या सामर्थ्याच्या उपयोगांच्या दृष्टीनें त्याला वाटत असलेलें आपल्या राष्ट्राविषयींचें प्रेम म्हणजे राष्ट्रीयत्व होय; परंतु राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेंत परस्परविरोधहि बसूं शकतो व तेंच युद्धास कारण होतें.

राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें मानवजातीची सेवा केलेली आहे. तिनें (१) सर्वसाधारण व्यक्तीला आपल्या हक्कांची जाणीव करून दिली, (२) राजा या संस्थेविरुद्ध महत्त्वाचा लढा दिला, (३) बुद्धिवादित्व व विज्ञान याची जोपासना केली, (४) राष्ट्रीय संस्कृतीची व साहित्याची वाढ केली आणि (५) सामाजिक भौतिक विचार वाढीस लावले. त्यामुळें समतास्वातंत्र्यादि मूल्यांचा विकास झाला.

राष्ट्रीय राज्याच्या कालखंडांतहि धार्मिक विचारांचें वर्चस्व कमी झालेलें होतें. उदाहरण म्हणून इंग्रजांच्या येथील राज्याचें देतां येईल. यांत इंग्रजांना धर्मप्रेमाला धक्का लावण्याचें धाडस झालें नाहीं असें म्हणण्यापेक्षां त्यांनीं धर्म हा विचार इतिहासजमा झाला हें ओळखलें होतें, असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. कारण आपले जे धार्मिक रिवाज नव्या सामाजिक धारणेस पोषक नव्हते, वा विरोधी होते, ते कायद्यानें नष्ट करण्यास ब्रिटिश राजकर्त्यांनीं मागेंपुढें पाहिलें आहे अशांतला भाग नाहीं. उदा० सतीबंदी, आत्महत्याबंदी इ.

टिळक–आगरकरांच्या कालांत स्वराज्य मिळालें असतें तर 'राष्ट्रीय' राज्याची स्थापना झाली असती. त्या वेळचा रूढ विचार म्हणजे राष्ट्रीयत्व हा होता. परंतु आज आपले विचार त्याच्या पुढें गेलेलें आहेत आणि म्हणूनच राष्ट्रीय अवस्थेवर समाधान मानणें योग्य होणार नाहीं. त्याबाबत मुग्ध राहिलें तरी तें विशेष परिपोषक आहे, अशांतला भाग नाहीं. मानववादी राज्यापूर्वीचें अशी राष्ट्रीय राज्याची कल्पना आहे. आज ती कल्पना मागें पडत आहे--नव्हे प्रतिगामी गणली जाईल--हें लक्षांत धरणें आवश्यक आहे.

## धर्मसंस्थेचें इतिहासांतील कार्य

आणि राष्ट्रीय राज्याच्याहि पूर्वीची अवस्था म्हणजे धार्मिक राज्याची आहे. आज 'सेक्युलर स्टेट' हें या धार्मिक राज्याविरुद्ध आहे, असें म्हटलें जातें, व या धर्मातीत राज्याला विरोधी असणारे लोक हे 'धार्मिक राज्या'चा आग्रह धरतात, त्यालाच 'राष्ट्रीय' राज्याचा मुलामा देतात. कारण आधुनिक विचारांचा भाग म्हणून राष्ट्रीयत्वाचा अभिमान मात्र ह्याहि लोकांस वगळतां येत नाहीं. किंबहुना धार्मिक राष्ट्रीयत्व ही नवी विचारसरणी ह्या लोकांनीं निर्माण केलेली आहे.

या विरोधी लोकांचा वैचारिक आशय लक्षांत घेणें जरूर आहे. त्यांच्या मताचा निष्कर्ष असा : 'धर्म ह्या संस्थेनें उन्नत जीवितमूल्यांची जोपासना केलेली आहे. तीं उन्नत मूल्यें सर्वसाधारण माणसालाहि प्रिय वाटत आलीं आहेत. तीं मूल्यें सनातन आहेत. आणि अशा उन्नत मूल्यांचे श्रेष्ठ पुरस्कर्ते ज्या ज्या राष्ट्रांत–म्हणजे-देशांत झालेले असतील, त्या त्या देशांनीं–म्हणजे राष्ट्रांनीं त्या त्या पुरस्कर्त्यांच्या विचारसरणीचा वा मूल्यांचा अवलंब करावा. त्या उन्नत मूल्यांसाठीं नव्या नव्या शोधांनीं उपलब्ध झालेलें आपलें सर्व सामर्थ्य वेंचावें. अर्थात् या गोष्टीच्या अवलंबनानें नवा भ्रातृभाव निर्माण होईल व मानवसमाज उच्च







अवस्थेप्रत जाईल. प्रत्येक धर्माला जीवितमूल्यांबरोबर एक प्रकारची वैशिष्ट्यपूर्ण समाजरचना अभिप्रेत असते. आणि तिचा अवलंब करण्यांत मानव-जातीचें कल्याण आहे.' धर्माधिष्ठित राज्य पुरस्कारणाऱ्यांचें असें मत असतें. त्या मताचा अधिकाधिक सहानुभूतीनें विचार करून हा आशय मांडलेला आहे. ह्या आशयाची चिकित्सा करण्या-पूर्वी धर्मसंस्थेचें स्वरूप व तिनें केलेलें कार्य या संबंधीं थोडें विवेचन करणें आवश्यक आहे.

ज्याप्रमाणें राष्ट्रकल्पनेचा उदय मानवी संस्कृतीच्या विशिष्ट अवस्थेंत झाला, त्याचप्रमाणें धर्मसंस्थेचाहि उगम मानवी संस्कृतीच्या विशिष्ट अवस्थेंतच झाला आहे.

मानवी समाजानें कृषि-अवस्थेत प्रवेश केल्यावर जी समाजरचना निर्माण झाली, जें राज्य झालें, गांव झालें, त्यांत दोन वर्ग झाले. पहिला प्रामुख्यानें शेतीच्या उत्पादनकार्यांत राबणारा, बहुसंख्य वर्ग व त्याचा उपभोग घेऊन सवड सवलत मिळाल्यानें निरनिराळ्या प्रकारची बौद्धिक प्रगति करतां येणें ज्याला शक्य झालें असा दुसरा वर्ग. पहिला बहु-संख्य वर्ग हा पूर्ण अज्ञानी. उलट, अल्पसंख्य वर्ग हा ज्ञानी, कवि, ऋषि या प्रकारचा. ह्या दुसऱ्या वर्गानें समाजाच्या धारणेच्या दृष्टीनें नियम केले, व्यक्तिगत जीवनाला वळण लागावें म्हणूनहि कांहीं नियम सांगितले. तसेंच मानवी जीवितासंबंधी जें ज्ञान झालें त्यातून तत्त्वज्ञान व अध्यात्मविचार यांचाहि उदय झाला. पण यापेक्षां सर्वांत महत्त्वाचा विचार म्हणजे परमेश्वराचा विचार होय. माणसानें शेतीचा 'शोध' जरी लावला, तरी एकंदर भौतिक परिस्थितीवर त्याचें प्रभुत्व फार मर्यादित होतें. मानवी जीवित हें निरनिराळ्या संकटांनीं व्याप्त व अनिश्चित असेंच होतें. एकंदर परिस्थिति कांहीं विशेष आशादायक नव्हती. त्याच परि-स्थितीशीं झगडून तींतून मानवाला मार्ग काढावयाचा होता. त्यासाठीं जीवनावर वा जीवन देणाऱ्या शक्तीवर अढळ विश्वास असणें क्रमप्राप्त होतें. ह्या विश्वाच्या मार्गे कोणी तरी परमेश्वर आहे, त्याच्या कृपेनें हें सर्व जीवन सह्य, सुकर व सुखी होत असतें इत्यादि विचार हा अत्यंत धीराचा विचार होता. त्यानें एक प्रकारचें धैर्य, एक प्रकारची न्याय-बुद्धि व एक प्रकारचें सामाजिक मानसिक स्वास्थ्य हीं तीनहि उपलब्ध झालीं. ह्या धर्मवर्चस्वाच्या कालांत युद्धें, लढाया इत्यादि प्रकार झाले. निरनिराळ्या सामाजिक घडामोडी झाल्या. तरी माणसांचें मन या प्रकारच्या ठराविक विचारांनीं भारलें होतें असें म्हणतां येतें. धर्माच्याच नांवा-खालीं पुढें जें मोठें दास्य निर्माण झालें, तें जर सोडून दिलें तर धर्मसंस्थेचें कार्य, थोडक्यांत स्वरूप, कसें आहे हें लक्षांत घेऊन तिनें कोणतें कार्य केलें तें लक्षांत घेऊं लागलों तर पुढील निष्कर्ष साधारणपणें आपल्या हातीं येतात : ( १ ) धर्मसंस्थेनें विशिष्ट समाजव्यवस्थेचा पुरस्कार केला व त्या दृष्टीनें कर्तव्यें आंखून दिलीं. ( २ ) धर्मसंस्थेनें मानवी जीवनाचा व्यापक दृष्टीनें विचार करून विशिष्ट तत्त्वज्ञान निर्माण करण्याचा प्रयत्न केला. ( ३ ) या तत्त्वज्ञानाच्या आधारेंच आध्यात्मिक वा पारलौकिक जीवनाचें महत्त्व ठसविलें. ( ४ ) व्यक्तीच्या आदर्श आचरणासाठीं कांहीं व्यक्तिगत जीवनांत महत्त्वाचे असे नियम वा कर्तव्यें घालून दिलीं. ( ५ ) या विविध गोष्टींच्या परिपूर्तीसाठीं विशिष्ट शिक्षणपद्धति व विशिष्ट साहित्यहि निर्माण केलें.

'धर्म' म्हटल्यानंतर ह्या पांच गोष्टींची एक-समयावच्छेदेंकरून तयार केलेली विशिष्ट प्रणाली असा संकेत सर्वसामान्यपणें अभिप्रेत असतो वा असावा. यांत समाजपरिस्थिति व व्यक्तिगत कर्तव्यें यांचा विचार हा परिस्थितिसापेक्ष करावा लागतो, व मग तो अपुरा पडतो नि त्यामुळें तो बदलावा लागतो. अर्थात् धर्माच्या नांवावर त्या-योगें चिकटून कांहीं राहिलें असेल तर धर्म, परमेश्वर, मोक्ष, नीति इ. तत्त्वेंच होत. तेहि विचार बरेचसे आध्यात्मिक महत्त्वाचे आहेत. धर्मसंस्था जेव्हां एक सामाजिक शक्ति म्हणून होती तेव्हां ते जिवंत वाटले. पण पुढें पुढें ते अग्राह्य, अपुरे वाटूं लागले; त्यांचें 'सनातनत्व' हें विवाद्य ठरलें गेलें.

धर्मसंस्था ही इतिहासांत प्रदीर्घ काल टिकली आहे. गेलीं हजार वर्षें तर तिच्यांतलें चैतन्य नष्टच झालें आहे. धर्माच्या नांवाखालीं कर्मकांडाचें महत्त्वच आग्रहानें मांडलें गेलें. तें कर्मकांडाचें

महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न कांहीं संप्रदायांनीं केला. त्यामुळेंहि कांहीं धर्म निर्माण झाले आहेत आपल्या-कडील भागवतधर्मांचा प्रयत्न व युरोपांतील धर्म-सुधारणेची चळवळ हे प्रयत्न त्यापैकींच होत.

### धर्माचें सार्वभौमत्व नष्ट झालें !

आतांपर्यंत वर पाहिलेल्या धर्माच्या सर्वंकष स्वरूपामुळें धर्मानें मानवी जीवनावर एक प्रकारचें सार्वभौमत्व मिळविलें होतें. तथापि, आधुनिक युग सुरू झालें. नवे नवे विचार पुढें येऊं लागले. आणि सर्वच क्षेत्रांतील ( सामाजिक ) धर्माचें सार्वभौमत्व नष्ट झालें. तीहि एक मोठी प्रक्रिया आहे.

समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें आधुनिक कालांत समाजाची धारणा बदलली. मध्यमवर्ग निर्माण झाला. त्यानें राज्यसंस्था व धर्मसंस्था ह्यांची फारकत पूर्ण केली. पुढें राजा ही संस्थाहि नष्ट करविली. आणि आधुनिक राज्यकारभाराच्या निरनिराळ्या अंगोपांगांस सुरुवात झाली. उदा० विधिमंडळें, न्यायालयें, मंत्रि-मंडळें इत्यादि. या गोष्टींनीं समाजाच्या बऱ्याच भागांतून धर्मसंस्थेचें प्राबल्य कमी झालें. समाज-व्यवस्थेचे नियम धर्मनिरपेक्ष होऊं लागले.

आधुनिक कालाचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे वैज्ञानिक प्रगति. तिनें माणसाचें भौतिक सृष्टीवरील प्रभुत्व वाढविलें. माणूस हा पूर्वीइतका दुबळा राहिला नाहीं. त्याच्या अंगांत एक नवें सामर्थ्य—व्यक्तिवादित्व—निर्माण झालें. विज्ञानशास्त्रांनीं उपलब्ध केलेल्या या ज्ञानामुळें धर्मग्रंथांतील इतर 'ज्ञान' हें विवाद्य झालें. ज्ञानाच्या क्षेत्रांतील धर्माची अधिसत्ता कमी झाली.

याच विज्ञान-प्रगतीचें दुसरें अंग म्हणजे बुद्धि-वादी विचार. त्यानें तत्त्वज्ञानाला नवें वळण मिळालें. तत्त्वज्ञानाचा विचार परमेश्वरनिरपेक्ष व धर्मनिरपेक्ष सुरू झाला. धर्मप्रणीत तत्त्वज्ञान हें बुद्धि-वादित्वाच्या कसोटीवरून परीक्षिलें जाऊं लागलें. व्यक्तीला वर्तणुकीसाठीं धर्माचा आदर्श हा अर्थातच वाटेनासा झाला. साहजिकपणें, वर उल्लेखिलेल्या बुद्धिवाद, उदारमतवादित्व. राष्ट्रीयत्व, इ. प्रणाली ह्या व्यक्तिविकासासाठीं आधारास घेतल्या जाऊं लागल्या. त्यांच्या आधारें मानवाचें व्यक्तिगत जीवन बनूं लागलें, घडूं लागलें.

या विचारांतून समता, स्वातंत्र्य, बंधुत्व इत्यादि तत्त्वें उदयास आलीं. त्यांनीं धर्मानें पुरस्कारिलेल्या आध्यात्मिक मूल्यांची जागा घेतली. मानवी जीवन-विचार हा मानवनिष्ठेवर व भौतिक पातळीवर आला.

शिक्षण ही संस्था राज्यसंस्थेनें हातांत घेतली. निरनिराळीं सामाजिक शास्त्रें, राज्यशास्त्र, समाज-शास्त्र, तत्त्वज्ञान, साहित्य, व रसायनशास्त्र, पदार्थ-विज्ञान इत्यादि भौतिक शास्त्रें, स्वतंत्रतया वाढीला लागलीं. त्यांची वाढ धर्म-परमेश्वर-निरपेक्ष होऊं लागली.

ही प्रक्रिया जगांत गेलीं ४–५ शें वर्षें चालू आहे. व तिनें धर्माचें मानवी जीवनावरचें प्रभुत्व नि सार्व-भौमत्व हीं धुळीस मिळविलीं आहेत. थोडक्यांत म्हणजे मानवी जीवन हें साभिप्रायतेनें धर्मातीत झालेलें आहे.

धर्माचा एकच भाग आजकाल त्याच्यासाठीं -म्हणजे धर्मासाठीं-राहिलेला असा ओळखला जातो व तो म्हणजे विशिष्ट अध्यात्मविचार व परमेश्वर-पूजा वा उपासना. ह्या गोष्टी आज पूर्णपणें व्यक्ति-गत स्वरूपाच्या आहेत. त्या वेळींहि मागें त्या तशाच होत्या. आणि या गोष्टींवर आक्रमण करण्यासाठीं कोणतीहि अधिकृत अशी समाजसंस्था पुढें आलेली नाहीं. आपल्या उपास्य दैवताला पूजण्याचा हक्क हा कोणीहि काढून घेतलेला नाहीं. आपल्या स्वतः-च्या आध्यात्मिक विचारान्वयें, विशिष्ट प्रतीति-स्वरूपाचा ( आध्यात्मिक ) आनंद मिळविणें हें कोणीहि बहिष्कृत केलेलें नाहीं. या गोष्टींचा समा-वेश व्यक्तिगत हक्कांत फार तर होईल, आणि तसा तो झालेलाहि आहे.

या ऊहापोहावरून मानवी जीवन हें विचार-आचार, कर्तव्य, मूल्यें, इ. दृष्ट्या कसें धर्मातीत झालेलें आहे ह्याची कल्पना येईल. अर्थात् राज्य-संस्थाहि पण धर्मातीतच असावी वा व्हावी हें पण क्रमप्राप्तच झालें.

### आपली विशिष्ट परंपरा

मानवी जीवनाची धर्मातीत बनण्याची प्रक्रिया पाहिली तरी आपणांस ती स्वीकार्य आहेच असें कशावरून, अशीहि शंका घेतां येईल. कारण वर










जीं धर्माचीं स्वरूपें म्हणून पाहिलीं तीं अगदीं तंतोतंत हिंदुधर्मास लागू पडत नाहींत. इतर-धर्मापेक्षां हिंदुधर्म हा वेगळा आहे. किंबहुना इतर धर्मांना धर्म ज्या अर्थानें संबोधितां येतें, त्या अर्थानें हिंदुधर्मास 'धर्म' संबोधितां येत नाहीं. अशी थोडीशी वस्तुस्थिति आहे. तेव्हां आपल्या ऐतिहासिक परंपरेच्या आधारें धर्मातीतत्व हें कसें अपरिहार्य व योग्य आहे, हें दाखविणें आवश्यक वाटतें.

हिंदुधर्म ही निरनिराळ्या धर्मविचारांची एक कंथा आहे. कांटेकोरपणें पाहतां हिंदुधर्मास अभिप्रेत असणारा धर्म म्हणजे ब्राह्मणधर्म–म्हणजे ज्याला चातुर्वर्ण्य व चतुराश्रमयुक्त समाजव्यवस्था अभिप्रेत आहे तो. आज या ब्राह्मणधर्माचें जें मोक्षाचें वा प्रतीतिस्वरूपाचें तत्त्वज्ञान आहे तें व्यक्तिगत महत्त्वाचें असें कांहींना वाटेल. परंतु चातुर्वर्ण्य कोणाहि सूज्ञ व समताप्रेमी मनुष्याला मान्य होईल, असें वाटत नाहीं. आजच्या समाजरचनेचें चातुर्वर्ण्यांत रूपांतर करविणें कोणालाहि शक्य नाहीं. किंबहुना कोणत्याहि समाजाचें तात्त्विक स्वरूप चातुर्वर्ण्यात्मक असतें, असें म्हणणें दूरान्वयाचेंच होईल. आजच्या समतेच्या मूल्याशीं व लोकशाहीशीं चातुर्वर्ण्य ही समाजरचना पूर्णपणें विरोधी आहे. म्हणून चातुर्वर्ण्यावर व हिंदुधर्मावर अधिष्ठित अशा राज्याचा पुरस्कार करणाराची लोकशाहीनिष्ठा व समतानिष्ठा ह्या दोन्हीहि शंकास्पद ठरतात. त्या निष्ठा प्रमाण मानणाऱ्यास तर हिंदुधर्माधिष्ठित राज्य मान्य होणें हें कठिणच आहे. शिवाय जातिभेद हें चातु-र्वर्ण्याचें अपरिहार्य पर्यवसान आहे. आणि त्या-विरुद्ध आपला साक्षेपानें रोख आहे, हें पण विसरून चालत नाहीं.

त्याशिवाय आपल्या दृष्टीनें धार्मिक राज्य प्रस्थापिण्यांत अनेक अडचणी आहेत. आपली परंपरा हिंदुधर्माची आहे तशी तींत बौद्ध, जैन, नानक, तसेंच महानुभाव, लिंगायत, इ. धर्मांचाहि भाग आहे. ह्या धर्मांचा प्रयत्न मूळ धर्मावर प्रत्याघात करण्याचा आहे. तो योग्य वा अयोग्य, यशस्वी वा अयशस्वी, हा भाग वेगळा. ते 'भारतीय' प्रयत्न आहेत हें विसरतां येत नाहीं. आजच्या समतेचें तत्त्व हें 'परकीय' आहे नि तें त्याज्य आहे असा युक्तिवाद कोणी करणें अगदीं अशक्यांतले खास नाहीं. तथापि, आज आपल्याला अभिप्रेत असणारी समता बौद्धधर्मास अभिप्रेत होती असें दिसतें. आणि त्याचमुळें त्या धर्माच्या कांहीं गोष्टी (उ० राष्ट्रध्वज किंवा राष्ट्रमुद्रा यावरील चिन्हें) आपण घेतलेल्या आहेत. पण त्याचा अर्थ आपण वा आपले राज्यकर्ते त्या धर्माच्या आहारीं गेले आहेत, असा निश्चितपणें नव्हे.

आपल्या राष्ट्रांत राष्ट्रीय वृत्ति नाहीं. तेव्हां राष्ट्रीय वृत्ति अंगीकारण्यासाठीं तरी धर्माधिष्ठित राष्ट्रीयत्वाचा अवलंब करणें व्यवहार्य ठरेल, असाहि पण एक युक्तिवाद पुढें येईल. राष्ट्रीय वृत्तींत धर्मा-धिष्ठित राष्ट्रीयत्व हें अधिकाधिक प्रतिगामी असतें. धर्म ही संस्था इतिहासजमा झालेली आहे. साहजिकपणें तिच्यावर राष्ट्रीयत्व आधारणें हें अयोग्य आहे. त्यांत स्वप्नाळूपणाचा अवास्तव भाग अधिक राहील. तें राष्ट्रीयत्व आंधळें व दुबळें होईल. राष्ट्रीयत्वास धर्माचीच कास धरावयास हवी, असें बिलकुल आवश्यक नाहीं. सामाजिक समता प्रस्थापित करणें, सामाजिक न्याय प्रस्थापित करणें, लोकशाहीची चाड बाळगणें हीं तत्त्वें वा मूल्यें अत्यंत प्रभावी आहेत. त्यांना योग्य तऱ्हेनें जनमनांत प्रसृत करण्याचें ठरविलें तर कोणत्याहि राष्ट्रीयत्वा-पेक्षां अधिक प्रभावी अशी एक भ्रातृभावाची अशी निष्ठा वाढीला लागेल, कीं जी एक जिवंत नि सामाजिक शक्ति म्हणून प्रभावी कार्य करूं शकेल. लोक-शाहीसाठीं आपला समाज नालायक आहे असें म्हणणें जितकें वेडेपणाचें होईल, तितकेंच ह्या मूल्यां-वर राष्ट्रीयत्व उभारतां येणार नाहीं, हें म्हणणें होईल.

### यापुढच्या कालाचा प्रभावी विचार

तेव्हां आजच्या कालास योग्य व भव्य असें राष्ट्र निर्माण करावयाचें असेल तर, तें धर्मातीतच करावयास हवें. मानववादी 'राष्ट्रीयत्व' हा आजच्या युगाचा विचार आहे, हें आपण पटवून घ्यावयास हवें. राष्ट्राला निरनिराळ्या दृष्टींनीं समर्थ करावयाचें काम आज आपणांपुढें आहे. त्या सर्व क्षेत्रांना आकर्षक वाटणारा असा हा धर्मातीतत्वाचा एक विचार आहे. आजच्या तरुण पिढीच्या मनाचा

आपण जर कानोसा घेतला तर, त्यांत आपणांस त्या पिढीला हा विचार अत्यंत उत्स्फूर्त वाटत आहे असें आढळून येईल. यापुढचीं आपल्या राष्ट्रांतील कला, साहित्य, इत्यादि अशा प्रकारें मानववादीच राहिलीं पाहिजेत. तशीं तीं राहतील अशी आपण कोशीस केली पाहिजे. तरच जें भव्य उत्थान आपण घडवून आणणार आहोंत, तें शक्य कोटींतील होईल.

आजच्या कालांत नव्या राष्ट्राची उभारणी करतांना जगाच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीचाहि विचार करावयास हवा. त्या दृष्टीनें तर धर्मातीतत्वासारखा दुसरा श्रेष्ठ विचार सांपडणें कठिण आहे. आज आपण राष्ट्रीयत्वाच्या युगांत रहात आहोंत. तथापि, राष्ट्रीयत्वाचें युगहि संपुष्टांत येत आहे, हें लक्षांत धरणें आवश्यक आहे. राष्ट्रीय वृत्ति वर्धमान करावयाची तीहि पण अशाप्रकारें आंतरराष्ट्रीय विचारांशीं सुसंगत असणें आवश्यक आहे. प्रत्येकाला समान संधि, व त्यासाठीं किमान सामाजिक सुस्थिति व सामाजिक न्याय आणि समता ह्यांची प्रस्थापना कोणतें राष्ट्र प्रथम प्रस्थापित करतें याबाबत खरी चढाओढ असावयास हवी. तथापि, ती परिस्थिति जरी दूर असली तरी, आपलें तोंड तरी त्या दिशेला असावयास हवें, व धर्मातीत राज्याच्या प्रस्थापनेनें तें तसें राहणार आहे.

नवराष्ट्रवादाच्या जागृतीच्या दृष्टीनें व लोकशाहीच्या वाढीच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा हा विचार आहे. आज त्याची उपेक्षा होत आहे, असें दिसतें. बहुजनसमाज तर अज्ञानांतच आहे. त्याला आणखी भुलविण्याचे प्रयत्न होत आहेत. तथापि, सुशिक्षित वर्गहि याबाबत उदासीन आहे, असें दिसतें. ही उदासीनता योग्य नव्हे, असें वाटून त्यासंबंधीं कांहीं विचार प्रदर्शित करणें आवश्यक वाटलें.

---

# तापी, तुझ्या तीरावर --

दोन दरडींत तुझें
तुझें पाहुनिया रूप
माझ्या पहिल्या भेटीची
कल्पनेच्या पल्याडची

मला दर्शन घडलें
मन माझें लोभावलें
आस तेथें तृप्त झाली
मूर्ति मज गवसली १

किती खोलांत वहासी
नाहीं नादतां खळाळ
कोण तपस्वी तूं बाला
सुकृताच्या पुण्याईची

शान्त तुझी माजधार
नाहीं चंचल शृंगार
घोर तप मांडुनिया
चाले कास धरुनिया २

कसें तुळावें तुला मी
साता जन्माची ओळख
तुझ्या पात्रांत मी उभा
उभ्या जन्माचा तान्हेला

तुझ्या गंभीर रूपाला
मात्र गांवली मजला
जग विसरून आलों
तुझ्या कुशींत दडलों. ३

एक व्हावें तुझ्याशीं मी
परी आत्म्याला बंधन!
तहानेला पाणी प्याला
एक वेडा जीव मात्र

एक मनीषा हेरली
माझ्या देहाच्या राउळीं
संतोषून चाले वाट
उभा अजून पात्रांत. ४

वाऱ्यासंगें हलकेच
पहाटेची चिवचिव
बुडालेल्या घागरीची
हापटल्या आवाजाची

लाट पात्रांत उठली
कानां रिझवीत गेली
साथ कुठेशीं मिळाली
साद पात्रांत घुमली. ५

तापी तुझ्या तीरावर
खोल तुझ्या उरांतलें
तुझ्या पात्राचें सैकत
त्याच सौख्याच्या जाणिवें

मला जीवन लाभलें
गीत मला ऐकूं आलें
पाया हळूं निलगलें
तेथें आसन मांडलें. ६

— गणेश कुडे










श्री. शंकरराव देव

# गीता, टिळक आणि गांधी : २ श्रीअरविंदांची साधना

मागील लेखाच्या शेवटीं श्रीअरविंद घोष यांच्या गीतेवरील निबंधांतील 'कुरुक्षेत्र' या प्रकरणांतील थोडा मजकूर विषयाच्या संदर्भानें उद्धृत केला होता. या लेखाचा प्रारंभ, त्यांचें म्हणणें ह्या गीतेवरील निबंधांतून थोडें अधिक विस्तारानें मांडून, करण्याचें योजिलें आहे :

## वस्तुस्थिति आणि आदर्शनिर्मिति

"आत्मभाव जागृत झाल्यामुळें अध्यात्म-जीवन जगण्याची ज्याला इच्छा उत्पन्न होते त्या पुरुषाला हें जग जसें आहे तसा त्याचा स्वीकार करणें व त्यांत व्यवहार करणें कठिण जातें. या जगांत सर्वत्र सत्याचें साम्राज्य, शिवाचा साक्षात्कार व सुंदरतेचें दर्शन घडलें पाहिजे, निदान घडावें, असें त्याला वाटतें. पण आज जग जसें आहे त्यांत त्याला या गोष्टीचा अभावच दिसतो. स्वतः ईश्वराचा जसा शिवावतार आहे तसा रुद्रावतारहि आहे. जीवनाची गंगा संघर्ष व युद्ध यांच्या कांठांमधून रक्ताच्या प्रवाहानें वाहत आहे, असें तो पाहतो. जीवन हें रणक्षेत्र असून ईश्वर ही त्याची अधिष्ठात्री देवता आहे, असें दृश्य कुरुक्षेत्रीं अर्जुनाला दिसलें. जीवन असें आहे, ही गोष्ट आपण प्रामाणिकपणें वा धैर्यानें मान्य केली नाहीं तर, त्याच्यांत जे विसंवाद (discords) व विरोध (oppositions) आहेत ते समूळ नष्ट करण्याचा उपाय आपण शोधून काढूं शकणार नाहीं. आज जग जसें आहे तसें तें यथार्थानें समजून घेतलें, तरच उद्यां तें जसें असावें असें आपल्याला वाटतें, तसें बनविण्याचा मार्ग शोधून काढण्यात आपल्याला अधिक यश येईल. जगाच्या आजच्या ज्या स्वरूपाचा आपल्याला उबग येतो त्या स्वरूपांतच, त्याच्या अंतिम सुसंवादित्वा-(Harmony)ची गुरुकिल्ली असेल. म्हणून जगापासून विषादानें वा वैतागानें आपण दूर जाऊं तर कदाचित या किल्लीला मुकूं.

"जीवनाच्या भौतिकच नव्हे तर, बौद्धिक, सामाजिक, नैतिक व राजकीय अशा सर्वच क्षेत्रांत संघर्षाशिवाय एक पाऊलहि आपण पुढें टाकूं शकत नाहीं. जें अस्तित्वात आहे व जगूं इच्छितें आणि जें अस्तित्वांत येऊं इच्छितें व जगूं इच्छितें, त्यांच्यांत अविरत युद्ध सुरू आहे. अहिंसा (Harmlessness) परमधर्म खरा; पण आज आम्ही व निसर्ग जसें आहोंत त्या स्थितींत केवळ अहिंसेनें प्रगति असंभवनीय आहे. आत्मबलाचाच उपयोग करावयाचा म्हटलें तरी, आत्मबल प्रभावी होण्यापूर्वी पाशवी शक्ती या जगांत थैमान घालतात व घालीत राहतीलच. शिवाय खुद्द आत्मबलहि जेव्हां प्रभावी होतें तेव्हां विनाशच करतें. आघात आणि प्रत्याघात या निसर्गाच्या नियमाप्रमाणें आत्मबलाचा उपयोग प्रचंड विनाशक शक्तींना जागृत करून त्यांना कार्यान्वित करतो. स्वतः आपण हिंसेचें प्रत्यक्ष निमित्त झालों नाहीं, हें आत्मसमाधान जगांतील हिंसा व विनाश थांबवूं शकत नाहीं. केवळ आपले हात स्वच्छ व आत्मा निष्कलंक राहिल्यानें विश्वांतील संघर्षाचा व विनाशाचा कायदा किंवा धर्म नष्ट होणार नाहीं. त्याचें जें मूळ आहे तेंच मानवजातींतून लुप्त झालें पाहिजे. जगांत जें अशिव अथवा जी दुष्टता (evil) आहे त्याचा प्रतिकार करण्याची अनिच्छा वा असमर्थता व त्या अनिच्छेची व असमर्थतेची जननी जी निष्क्रिय शांति—यांमुळें या धर्माची अगर कायद्याची आवश्यकता नष्ट होणार नाहीं. म्हणून संघर्ष व तज्जन्य विनाश यांच्यापासून








व्यक्ति दूर राहील तर तिच्या नैतिक जीवनाला मदत होईल. पण त्यामुळें रुद्रावताराचें कार्य थांबणार नाहीं.

" आपण ईश्वराचा शिवावतार व त्याचें कार्य यांवर विचारानें व आचारानें भर देण्याचा प्रयत्न करावा हें स्वाभाविक आहे. संघर्ष व विनाशक संहार हेंच कांहीं सर्वस्व नाहीं. संघर्ष व विरोध यां-प्रमाणेंच संघवृत्ति व संजीवक सहकार्य हींदेखील तत्त्वें जगांत नांदत आहेत. द्वेषाप्रमाणें प्रेम, व इतरांचा बळी घेण्याच्या ईर्षेप्रमाणेंच आत्मबलिदान करण्याची इच्छा हींदेखील माणसाच्या अंतःकरणांत वसत आहेत. परंतु दुर्दैव असें कीं, आज या शक्तीहि त्यांच्या विरोधी शक्तींच्या कार्यालाच जुंपल्या जात आहेत, इकडे कानाडोळा करून भाग-णार नाहीं. धर्माच्या अगर देशभक्तीच्या नांवावर आजपर्यंत जगांत केवढा संघर्ष व संहार झाला आहे! या सर्वांवरून जी एक गोष्ट सिद्ध होते, ती ही कीं, निसर्गांत असें एक तत्त्व आहे—जें कदाचित् (initial element) आरंभापासूनच असावें-कीं तें तत्त्व कसें जिंकावें हें आपण जाणलें नाहीं. तें जिंकणें शक्य नसेल किंवा त्याचें सत्य स्वरूप जाणून घेण्याचा आपण निःपक्षपाती दृष्टीनें प्रयत्न केला नसेल! जर आपल्याला योग्य उपाय शोधून काढावयाचा असेल—मग तो उपाय कोणताहि असो—तर जीवन (Existence) जसें आहे, तसें त्याच्याकडे पाहिलें पाहिजे. आणि जीवनाचें प्रत्यक्ष दर्शन म्हणजे ईश्वराचें दर्शन होय. कारण दोघांना वेगळें करतां येणार नाहीं. ज्यानें विश्व निर्मिलें त्याला त्याच्या धर्मांच्या, नियमां-(laws) च्या जबाबदारींतून मुक्त करतां येणार नाहीं. जें शिव तें ईश्वरानें केलें आणि जें अशिव तें दुसऱ्या कोणत्यातरी दुष्ट शक्तीनें घडविलें, असें म्हणून चालणार नाहीं. शिवाप्रमाणें अशिवाचा निर्माता ईश्वरच आहे, असें हिंदु धर्म मानतो.

" तेव्हां कुरुक्षेत्रावरील देव-सारथि हा सर्व लोकांचा ईश्वर व सर्व भूतमात्रांचा स्नेही व सर्वज्ञानी आहे. तसाच सर्व लोकांचा क्षय करण्याला प्रवृत्त झालेला तो कालहि आहे. परस्परविरोधी शक्तींचा संघर्ष, विनाश, मृत्यु व दुःख यांनीं गच्च भरलेल्या या विश्वांत मानवाला सर्वसाक्षी ईश्वराचें दर्शन करावयाचें आहे. या कोड्याचें कांहीं तरी उत्तर असलेंच पाहिजे, ही जाणीव माणसानें ठेविली पाहिजे. ज्या अज्ञानांधकारांत तो वावरत आहे त्याच्या पलीकडे ज्ञानप्रकाश असलाच पाहिजे, अशी श्रद्धा त्यानें बाळगली पाहिजे. ज्ञानप्रकाशांत सर्व विसंवाद (discords) एक तर नाहींसे तरी होतील किंवा त्यांच्यामध्यें सुसंवाद (harmony) तरी उत्पन्न होईल, अशी जगांतील सर्व धर्मांची श्रद्धा आहे. व्यक्तीच्या व विश्वाच्या आयुष्यांत मधूनमधून असे संकटप्रसंग (crisis) येतात, कीं जेव्हां महान् मानसिकच काय पण शारीरिक व भौतिक संघर्षहि होऊन सर्व प्रकारचा विनाश होतो.

" निसर्गाच्या उत्क्रान्तीमध्यें अशा घोर आणी-बाणीच्या संकटकाला-(crisis) ची आवश्यकता गीता मान्य करते. सदाचार व दुराचार यांमध्यें आणि स्वयंप्रमाण (self-affirming) धर्म व त्याला विरोध करणाऱ्या असत्स्वरूप शक्ती यां-मध्यें होणारा संघर्षाच्या रूपानें होणारा नैतिक लढा गीता मानते. एवढेंच नव्हे तर परस्परविरोधी शक्तीं-च्या प्रतिनिधिभूत अशा मानवांमध्यें भौतिक पातळी-वर होणारें शस्त्रयुद्धहि गीता मान्य करते. आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, गीता ज्या कालांत लिहिली गेली त्या कालीं युद्धें हें मानवी व्यवहाराचें आजच्यापेक्षां अधिकच आवश्यक अंग समजलें जात असे. जीवनाच्या योजनेमधून युद्धाची उचलबांगडी करण्याची कल्पनाच त्या वेळीं खुळचट-पणाची गणली जात असे. खरोखरीं, सर्व मानव-जातीमध्यें संपूर्ण सद्भावना असल्याशिवाय जगांत खरी शांति अशक्य आहे. पण विश्वशांतीच्या व सद्भावनेच्या धर्मानें मानवी प्रगतीच्या ऐतिहासिक कालांत माणसाच्या समष्टिरूप जीवनावर एक क्षणहि आपलें साम्राज्य चालविलेलें आढळून येत नाहीं. हेंहि खरें कीं, त्यासाठीं मानवाच्या मनाची नैतिक, सामाजिक व आध्यात्मिक तयारी केलीच गेलेली नाहीं. शिवाय निसर्गाचा विकास होत होत आज निसर्ग ज्या उत्क्रांतीच्या टप्प्यावर उभा आहे, तेथें जर त्याला आपल्या समतोल-पणांत बिघाड उत्पन्न होऊं द्यावयाचा नसेल तर,








तो निसर्ग सध्यांच्या परिस्थितीच्या मर्यादा उल्लंघूंहि देणार नाहीं. आजमितीलाहि मानवी हितसंबंधांत फारच विरोध उत्पन्न झाला असतां, घनघोर संग्राम टाळण्याकरितां असा समेट घडवून आणण्याची पद्धति शक्य आहे, असें केवळ वाटण्यापलीकडे या क्षेत्रांत आपली प्रगति झालेली नाही आणि हा समेट घडवून आणण्यासाठींहि माणसाला आपल्या स्वभावधर्माप्रमाणें, जिला इतिहासांत उपमा नाहीं अशा, आसुरी यादवीची वा कत्तलीची कांस धरणें भाग पडलें आहे. शेवटीं जगांत शांति प्रस्थापित करण्यासाठीं आधुनिक मानवानें शोधून काढलेला सरळ आणि प्रभावी मार्ग कोणता म्हणाल तर दुष्टपणा आणि द्वेष यांनीं भरलेल्या जागतिक युद्धाचा ! आज मानवाचे शान्तिस्थापना-विषयक प्रयत्न मानवी स्वभावांत मौलिक परिवर्तन घडवून आणण्यावर आधारलेले नाहींत. केवळ बुद्धिगम्य कल्पना आर्थिक, सोयी, भावविवशता, कींव व युद्धाचें भय—या गोष्टींवर ते प्रयत्न आधारलेले आहेत. शिवाय अशा प्रकारचे शांति-स्थापनेचे प्रयत्न साहजिकच राजकीय हेतूंनीं प्रेरित झालेले असतात. अशा प्रकारें घडवून आणलेली शांति डळमळीत आणि अल्पजीवीच ठरणार ! परंतु एक असा दिवस खात्रीनें उजाडेल कीं, जेव्हां विश्वशान्तीच्या साम्राज्यासाठीं नैतिक व सामाजिक तयारी पूर्ण झालेली असेल. ''

श्री अरविंद यांच्या ' गीताविषयक निबंध ' य पुस्तकांमधील ' कुरुक्षेत्र ' हें सर्व प्रकरण व ' मनुष्य आणि जीवनयुद्ध ' या प्रकरणांतील कांहीं प्रारंभींचा भाग यांतील प्रतिपादनाचा वर जो प्रदीर्घ सारांश दिला आहे, त्यांतून पुढील महत्त्वाचे मुद्दे निष्पन्न होतात :

( १ ) जग सत्य, शिव व सुंदर असावें, असें उदारचरित माणसाला वाटतें; पण प्रत्यक्ष जग तसें असल्याचा त्याला अनुभव येत नाहीं. तथापि, असें आदर्श जग निर्माण करण्याचा मार्ग आपल्याला अविरत उद्योगानें शोधून काढतां येईल. जेथें सर्व विसंवाद व संघर्ष विलीन होऊन जातील, असें ईश्वराचें प्रेममय व ज्ञानमय स्वरूप असलें पाहिजे, अशी श्रद्धा त्यानें बाळगावी.

( २ ) पण यासाठीं जग जसें आहे, तसें तें यथार्थानें जाणून घेतलें पाहिजे.

( ३ ) जगांत सर्वत्र हिंसा भरली असून जगाचा व जीवाचा विकास संघर्ष व हिंसा अगर युद्ध यांतूनच होत असतो. शिवावताराप्रमाणेंच स्वतः ईश्वराचा संहारकारी रुद्रावतारहि आहे.

( ४ ) आज आत्मबल अगर अहिंसा पाशवी बलाची अगर हिंसेची जागा घेऊं शकत नाहीं; जगाच्या व जीवाच्या सध्यांच्या विकासावस्थेंत आत्मबलहि अखेर अधिक हिंसेलाच जन्म देते व विनाश करते.

( ५ ) आपण ईश्वराच्या शिवावतारावर विचारानें अगर आचारानें भर द्यावा हें स्वाभाविक आहे. पण जोंपर्यंत संघर्षाचें व हिंसेचें मूळ मानवजातींतून आपण काढून टाकूं शकत नाहीं, म्हणजेच आपण मानवा-च्या स्वभावांत परिवर्तन करूं शकत नाहीं तों-पर्यंत एखादी व्यक्ति संघर्षापासून दूर राहिली तरी समष्टि त्यापासून मुक्त होणार नाहीं.

( ६ ) मानवी समाजाच्या उत्क्रांतीच्या प्रक्रिये-( process ) मध्यें गीतेनें युद्ध ही संस्था मान्य केली आहे. तथापि युद्ध ही कांहीं जीवनशास्त्रां-तील अपरिहार्य आवश्यकता ( Biological necessity ) आहे असें नाहीं. पूर्वीपेक्षां आज त्याची आवश्यकता कमी झालेली आहे; युद्ध टाळावें व मानवांनीं सामोपचारबुद्धीनें अगर दुसऱ्या शांततेच्या मार्गांनीं आपले हितविरोध नष्ट करावेत अशी इच्छा व प्रयत्न सुरू आहेत. पण अद्यापि त्याचा राजमार्ग मानवाला सापडला नाहीं. अद्यापि त्याची सर्व मदार युद्धावरच असून त्याची परिणति जागतिक युद्धाच्या ज्वालेंत विश्वशांति भस्म होण्यांत होते कीं काय, अशी भीति वाटत आहे. तथापि, एक दिवस असा उजाडेलच कीं, जेव्हां मनुष्याचा आध्यात्मिक, नैतिक व सामाजिक विकास इतका झालेला असेल कीं, युद्ध ही संस्था अजिबात नष्ट होऊन विश्वांत सर्वत्र शांतीचें साम्राज्य प्रस्थापित होईल.

अशा प्रकारची मानवजातीची भविष्यकालीन पूर्णावस्था लो. टिळकांनाहि अभिप्रेत होती. त्यांनीं म्हटलें आहे : ' साम्यबुद्धि बाढविण्याचा अभ्यास







प्रत्येकानें केला पाहिजे, आणि या क्रमानें जगांतील सर्व मनुष्यांची बुद्धि पूर्ण साम्यावस्थेस पोहोंचेल तेव्हांच कृतयुगप्राप्ति होऊन मानवजातीचें परमसाध्य जी पूर्णावस्था ती सर्वांस प्राप्त होईल.'

कोणत्याहि वस्तूंत सामान्य अगर संपूर्ण बदल घडवून आणावयाचा असेल तर त्या प्रमाणांत तिचें अंतर्बाह्य ज्ञान करून घेतलें पाहिजे, ही गोष्ट सहज मान्य होण्यासारखी आहे. तसें न करतां पूर्वग्रहदोषानें, द्वेषानें अथवा वैतागानें किंवा वैराग्यानें ती मोडून टाकली तर तिचा नाश केल्याचें समाधान मिळेल, पण तिच्यांत बदल केल्याचें श्रेय लाभणार नाहीं. तेव्हां सत्यासाठीं असत्य, शिवासाठीं अशिव व सौंदर्यासाठीं कुरूपता हीं जाणून घेतलीं पाहिजेत, हें अरविंदांचें म्हणणें मान्यच्च केलें पाहिजे. जगांत हिंसा नाहींच असें म्हणून अहिंसा प्रस्थापित करतां येणार नाहीं. अहिंसा प्रस्थापित करण्याचा खरा मार्ग म्हणजे जगांत हिंसा आहे हें नागवें सत्य मान्य करून ती नाहींशी करण्याचा मार्ग शोधून काढण्याचा अखंड उद्योग करणें हा होय. गांधीजी नेहमीं म्हणत कीं, ' मी स्वप्नसृष्टींत सदा वावरणारा व बरळणारा प्राणी नसून जागृत सृष्टींत व्यवहार करणारा पण माणसाला सत्य शिव व सुंदर सृष्टि निर्माण करणें शक्य आहे, अशी श्रद्धा बाळगणारा व त्यासाठीं अविरत उद्यमशील राहणारा प्राणी आहे.'

### विश्वतत्त्वाचें अनाकलनीय स्वरूप

' असा एक दिवस खात्रीनें उगवणार आहे कीं जेव्हां माणसाचा आध्यात्मिक, नैतिक, सामाजिक विकास इतका झालेला असेल कीं, त्याचे सर्व व्यवहार संपूर्ण सद्भावनेनें होऊं लागतील व जगांत सर्वत्र शांतीचें साम्राज्य प्रस्थापित होईल ' हें अरविंदांचें म्हणणें श्रद्धापूर्वक मान्य केलें तर, मग ओघानेंच ही गोष्टहि मान्य करावी लागेल कीं, निदान त्या दिवशीं मनुष्यसृष्टीपुरतें तरी ईश्वराचें रुद्ररूप सर्वस्वीं पालटून त्याला नीलकंठ शंकराचें शिवस्वरूप प्राप्त झालेलें असेल. मानवामानवांत संपूर्ण सुसंवादित्व प्रस्थापित होऊन त्यांचे व्यवहार सद्भावनेनें चालूं लागले तर त्याचा परिणाम पशु, पक्षी वगैरे इतर योनींवर काय होईल, योगसूत्रांत म्हटल्याप्रमाणें ("अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः"), संपूर्ण अहिंसावादी माणसापुढें पशुपक्ष्यांचीहि हिंसा गळून पडेल काय हाहि प्रश्न विचारणीय आहे. पण आपण सध्यां मानवजातीच्याच विकासाचा विचार करणें योग्य होईल. कारण आज तरी मानवच्च नीतिमार्गावर चालून स्वतःचा जाणीवपूर्वक विकास करून घेऊं शकतो. अहिंसेच्या आचरणाचा उपदेश गांधीजी मानवापुरतांच करीत, हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जो ईश्वर केवळ शिवस्वरूपांत भविष्यांत कधींकाळीं मानवी सृष्टीचा भर्ता, भोक्ता, महेश्वर व सुहृद् होणार (" भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् । सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ ") त्या ईश्वराच्या स्वरूपाची कल्पना अथवा साक्षात् दर्शन भूतकालीन वा वर्तमानकालीन अवतारी अथवा साक्षात्कारी पुरुषांना झालेलें असेल असें मानणें तर्काला धरून होईल काय ? ईश्वराचें सत्यस्वरूप कोणालाच कधीं समजलेलें नाहीं. तें सदां अनाकलनीयच राहिलेलें आहे. ("न मे विदुः सुरगणा प्रभवं न महर्षयः ।"). आपले अनुभव ' हें तें नाहीं, हें तें नाहीं,' ' नेति नेति ' असें सांगून शहाण्यांनीं या बाबतींत समाधान मानलें आहे. कारण (' न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ') परमेश्वराचें स्थान प्रकाशित करण्यास सूर्य, चंद्र किंवा अग्नि यांसारखें कांहीं साधन नसून तें स्वयंप्रकाशित स्वयंवेद्य आहे असें म्हटलें आहे. (स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम). या ईश्वराचें स्वरूप अगम्य आहे. नासदीयसूक्ताचा ऋषि म्हणतो : "(सताचा) विसर्ग म्हणजे पसारा कशापासून अगर कोठून आला हें (यापेक्षां) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सांगणार ? कोण तें निश्चयात्मक जाणतो ? देवहि या (सत् सृष्टीच्या) विसर्गानंतरचे. मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार ? (सताचा) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, हें तो परम आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष (हिरण्यगर्भ) तो जाणीत असेल किंवा नसेलहि ! (को चार ! रत्र पुसशी

को अद्धा वेद क इह झाली आहे.
कुत आजाता कुत कृ पाहत आहे.
अर्वाग् देवा अस्यजीवन कोमेजून



अनुक्रमणिका








अथ को वेद यत आबभूव ॥

इयं विसृष्टिर्यत आबभूव
यदि वा दधे यदि वा न दधे ।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्
सो अंग वेद यदि वा न वेद ॥

'परम आकाशांत असणारा या जगाचा अध्यक्ष हिरण्यगर्भ तोसुद्धां ईश्वराचें मूळ स्वरूप जाणीत असेल किंवा नसेलहि' असें हा ऋषि म्हणतो. एकच पाऊल पुढें जाऊन असें म्हणण्याचा मोह आवरणें कठिण गेलें तर नवल नाहीं कीं, खुद्द हा ईश्वरहि स्वतःचें प्रारंभींचे व अंतींचें स्वरूप जाणतो का? पण अशा वेळीं, याज्ञवल्क्यांनीं गार्गीला म्हटल्याप्रमाणें, हा प्रश्न केला तर प्रश्न करणाराचें टाळकेंच फुटावयाचें !

भगवान् बुद्धासारखे सिद्ध व ज्ञानी पुरुषहि ईश्वराच्या अंतिम व सत्य स्वरूपाविषयीं वादविवाद करण्याचें टाळतात त्याचें कारणहि कदाचित् हेंच नसेल कशावरून ? गांधीजींनींहि ब्रह्मज्ञानाचा काथ्याकूट करीत न बसतां, स्वानुभवानें त्यांना सत्याचें जसजसें स्वरूप प्रगट होत गेलें. तसतसें तें स्वतःच्या व समाजाच्या सामान्य व्यवहारांतहि आणण्याचा त्यांनीं अखंड उद्योग केला. निदान या सर्व विवेचनापासून विनयानें एवढा तरी बोध घ्यावयाला हरकत नाहीं कीं, कोणत्याही काळचा व कोणत्याही देशींचा कितीहि महान् साक्षात्कारी पुरुष असो त्यानें ईश्वर जो व जसा आहे तो व तसा त्याला जाणला आहे ('यावान्यश्चास्मि तत्त्वतः') व म्हणून या ज्ञानाच्या आधारें त्यानें जे नीतिधर्म व व्यवहारधर्म अनुशासिले ते सर्व देशीं व काळीं सत्य म्हणून बंधनकारक आहेत असा आग्रह कोणीहि धरूं नये. हा आग्रह मानवाच्या प्रगतीला हानिकारक ठरल्याशिवाय राहणार नाहीं. कारण विश्व विकासशील आहे व म्हणून पूर्वींच्या सत्पुरुषांचा याविषयींचा अनुभव द्वच्या मुमुक्षूंना प्रथम दर्शनासाठीं उपयोगी पडला अविरत उद्योगक मानणें चुकीचें ठरेल.

विसंवाद व संघर्ष दृष्टि
प्रेममय व ज्ञानमय
ह्यानें बाळगावी.

यांच्या माळेंतील साधारणतः मची संतमंडळी होत. त्यांनीं जाति-गोत्र-वर्णनिरपेक्ष सर्वांना भक्तिमार्गाचें परमेश्वरप्राप्तीचें व मुक्तीचें द्वार खुलें केलें आणि हे त्यांचे सामान्य जनांवर महान् उपकार होत, यांत संशय नाहीं. श्रीज्ञानेश्वर म्हणतातः— "ऐसे माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ ...परि राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारूं । होत जगा ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ (ज्ञानेश्वरी ९.२००–२०३)... 'ते पापयोनीही होतु का । ते श्रुताधीतही न होतु का । परि मजशीं तुकितां तुकां । तुटी नाहीं ॥ (९.४४९) ...येऱ्हवी दैत्यकुळ साचोकारें । परि इंद्रही सरी न लाहे उपरे । म्हणोनि भक्ति गा येथ सरे । जाति अप्रमाण ॥ (९.४५२)".

पण आध्यात्मिक किंवा धार्मिक क्षेत्रांतील समता (आणि तीहि भक्तिमार्गांतील) जीवनाच्या इतर क्षेत्रांत नेण्याची गरज त्या संतांना भासली नाहीं. इतर क्षेत्रांतील आचरणाच्या बाबतींत सर्वांनीं परंपरागत धर्म व सामाजिक रूढी यांचेंच पालन केलें पाहिजे असा त्यांचा कडक दंडक होता: 'तैसा अशेषाही पुरुषार्थी । जो गोसावी हो म्हणें पार्थी । तेणें श्रुतिस्मृति माथां । वैसणें घापे ॥ शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ॥'—ज्ञानेश्वरी (१६.४५९–४६०). धर्मविधी व धार्मिक संस्कार या बाबतींत ब्राह्मण व शूद्र यांच्यामध्यें ते भेद करीत: "तेंचि द्विजासीच ब्रह्मसूत्र । येरा स्तोत्र का नाममंत्र ।". रेड्याच्या पाठीवर मारलेल्या काठीचे वळ ज्यांच्या पाठीवर उठले, त्या श्रीज्ञानेश्वरांना, 'सांगे क्षुद्राघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केवि सेवावीं । दुर्बळू जरी जाहला ॥' असा प्रश्न करतांना आपण शूद्राचें का असेना, पण एक मानवी हृदय दुखाविण्याचा संभव आहे अशी शंका कां बरें आली नाहीं ? आज श्रीज्ञानेश्वरांना महान् संत समजून त्यांच्या पायांवर माथा तुकवीत, आपण त्यांना विनयानें पण ठासून असेंच सांगूं कीं, 'महाराज, आपल्या मतें जो धर्म










तो आम्हांला अधर्म वाटतो व त्याचें आचरण केलें तर आम्हांला पाप लागेल अशी आमची आज भावना आहे. '

संतांच्या मतें परलोकींचा किंवा मोक्षाचा धर्म निराळा व इहलोकींचा अथवा व्यवहाराचा धर्म निराळा होता. इहलोकींचा सर्व व्यवहारच असा झाला पाहिजे कीं, त्याला प्रत्यक्ष फळ ईश्वरप्राप्ति वा मोक्ष आलें पाहिजे, अशी त्यांची शिकवण नव्हती. संसाराचें आध्यात्मिकीकरण करण्याचें त्यांना कधीं सुचलें नाहीं हें मान्य करणें भाग आहे. वैयक्तिक जीवन व सामाजिक जीवन असा भेद त्यांनीं सदैव ठेवला. वैयक्तिक जीवनांत कमालीची अहिंसा, दया, क्षमा उपदेशिणाऱ्या श्रीतुकाराम-महाराजांनीं सामाजिक जीवनांत कमालीच्या कठोर-तेचें अगर हिंसेचें समर्थन केलें आहे : ' चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥ विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यास ॥ ' अशी महान् अहिंसेची शक्ति व संतांचें लक्षण सांगणारे तुकोबाच, ' दया तिचें नांव भूतांचें पाळण आणिक निर्दळण कंटकांचें ॥ परपीडक ते आम्हां दावेदार विश्वीं विश्वंभर म्हणूनिया ॥ ' असें बेधडक सांगतात. या दोन धर्मांत विसंगति आहे हें तुकाराममहाराजांसारख्या सत्पुरुषांना प्रामाणिकपणें वाटत नव्हतें. ईश्वर, त्याचें स्वरूप, त्याचा जगाशीं व माणसाशीं संबंध याबद्दलचे त्यांचे विचार व कल्पना वेदपुराणें व श्रुतिस्मृती यांमधून जशाच्या तशा घेतलेल्या होत्या. त्यांत कांहीं बदल होणें शक्य आहे किंवा झाला पाहिजे असें त्यांना कधींच वाटलें नाहीं. ( ' दया करणें जें पुत्रासी ॥ तेंचि दासा आणि दासी ' ). समाजांत आमूलाग्र बदल करणें हा त्यांचा कधींच हेतु नव्हता. व्यक्तींना म्हणजे त्यांच्या आत्म्यांना वांचविणें एवढेंच त्यांचें कार्य होतें व तें त्यांनीं तळमळीनें केलें. हें जग दुःखाचें आलय व अशाश्वत असल्यामुळें ( ' दुःखालयमशाश्वतम् ' ) त्यांतील जन्ममरणाच्या फेऱ्यांतून स्वतःची व इतरांची सुटका करून घेण्याचा मार्ग—परमेश्वरप्राप्तीचा मार्ग—शोधून काढणें हें त्यांचें जीवनकार्य होतें. अर्थात ' तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हासी ॥ ' अशी परमेश्वरापाशीं मागणी करणारे परमकनवाळू तुकारामासारखे कांहीं संत होते हें खरें; पण या त्यांच्या मागणीच्यामागें सर्व समाजाच्या उद्धाराचा अगर बदलाचा पद्धतशीर प्रयत्न करण्याची दिशा व आशा होती, असें मात्र नाहीं; केवळ प्राणिमात्रांचें दुःख व पीडा यांचें निवारण करण्याचें कार्य अखंड चालविण्याची मनाची तीव्र तळमळ त्यांत होती : ( ' न त्वहं कामये राज्यं न स्वर्गं नापुनर्भवम् । कामये दुःखतप्तानां प्राणिनामार्ति-नाशनम् ॥ ' ). इहलोकांतील जीवन हें आत्म्याचें खरें व शाश्वत जीवन नव्हे; मृत्यूनंतरचें म्हणजेच परलोकींचें जीवन हें त्याचें खरें व कायमचें जीवन, असें ते मानीत. म्हणून परलोकीं गमन केल्यावर आपल्या आत्म्याचें रक्षण माणसाला कसें करतां येईल याचा स्वानुभवावरून त्याला उपदेश करणें व मार्ग दाखविणें, एवढेंच त्यांचें ध्येय होतें.

याचा अर्थ असा नव्हे कीं, श्रीज्ञानेश्वर—किंवा—श्रीतुकाराममहाराजांच्यापेक्षां आम्ही नैतिक व आध्यात्मिक दृष्ट्या श्रेष्ठ आहोंत. आज परिस्थिति बदलली आहे. त्यांच्या काळीं जें शक्य नव्हतें तें आज शक्य झालें असेल किंवा उद्यां होईल. एखादी चांगली कल्पना अथवा विचार, त्यांचा व्यवहारांत अंमल करण्याला तयार असणाऱ्या कांहीं मोठ्या उदारचरित पुरुषांचीच फक्त मार्गप्रतीक्षा करीत असतात, असें मानणें बालिशपणाचें होईल. त्या विचारांचा अंमल करण्याला तयार असणाऱ्या पुरुषाप्रमाणेंच समाजमनाचीहि त्या विचारांचें स्वागत करण्याची हळूहळू तयारी व्हावी लागते.

परंतु आज एकट्यादुकट्या व्यक्तीच्या किंवा अनेक व्यक्तींच्या आत्म्यांचें परलोकाच्या दृष्टीनें रक्षण करण्याचा प्रश्न नाहीं. तर संघर्ष व संहार यांपासून समष्टीचें म्हणजे अखिल मानवसमाजाचें रक्षण करण्याचा प्रश्न आपणापुढें उभा आहे. ' येथें नीट जगूं तर दे. मग पुढें परलोकाचा विचार ! ' ' जया ऐहिक धड नाहीं । तयाचें परत्र पुससी काई । '' अशी माणसाची स्थिति झाली आहे. युद्धस्थिति ही नित्याची स्थिति होऊं पाहत आहे. मृत्यूच्या भीतीनें मानवाचें जीवन कोमेजून







किंवा करपून गेलें आहे. मातेच्या उदरांतून बाहेर येणें आणि मृत्यूच्या मुखांत प्रवेश करणें येवढेंच जणूं मानवाचें जीवन बनलें आहे. मुखानें शांति व मनानें युद्ध, निदान हातानें युद्धाची तयारी करणाऱ्या राजकारणी पुरुषांच्या जाळ्यांत मानवी जीवन सांपडलें आहे, इच्छा नसूनही ('बलादिव नियोजितः') सर्व विश्व युद्धाच्या खाईकडे खेंचलें जात आहे, असें वाटतें. 'शान्ति' 'शान्ति' असा मानवाच्या अंतःकरणगव्हरांतून वर आलेला निनाद आकाशांत सर्वत्र घुमत आहे. सर्व कर्मांच्या आदौ व अंतीं 'शांतिः शांतिः शांतिः' असा त्रिवार पाठ करणारे, शांति हें आत्म्याचें स्वरूप (शांतोऽयमात्मा) व शांति हेंच जीवनाचें लक्ष्य अशी ज्यांची शिकवणूक असे जे 'सर्वभूतहिते रत' ऋषी, त्यांनीं विश्वव्यापाराचीं सूत्रें आपल्या हातांतून कायमचीं खालीं ठेविलीं कीं काय, अशी आर्तस्वरानें सर्व मानवजात पृच्छा करीत आहे. जगांत आज सर्वत्र अशांति पसरली आहे. या भूतलावर मानव व त्याची संस्कृति राहते किंवा नाहीं, हें मानवाला विश्वशांति स्थापण्यांत जितपत यश येईल, त्यावरच अवलंबून आहे.

### आधीं संकल्प, नंतर त्याची सिद्धि

आत्मा एक संकल्प करतो पण त्याची सिद्धि हजारों वर्षांनीं होते. या संकल्पसिद्धीसाठीं असंख्य आत्मे खपतात किंवा एकच संकल्प अनेक आत्मे एकाच वेळीं करतात व त्याच्या सिद्धीसाठीं मानवाच्या पिढ्यान्‌पिढ्या प्रयत्नशील राहतात. काम किंवा संकल्प हा आत्म्याचा गुण आहे. संकल्पाशिवाय आत्मा ही कल्पनाच अशक्य आहे. 'ईश्वर म्हणाला: प्रकाश होवो आणि प्रकाश झाला' असें बायबलांत म्हटलें आहे. आत्मा प्रथम एकाकीच होता. "मी अनेक व्हावें—'बहुः स्याम्'" अशी त्यानें इच्छा केली आणि विश्वाची उत्पत्ति झाली, असें उपनिषदांत सांगितलें आहे. उपनिषदांत दुसऱ्या एका ठिकाणीं म्हटलें आहे: 'आत्मा हा सत्यकाम, सत्यसंकल्प आहे म्हणजे तो जें इच्छितो तें घडतें.' या केवळ कविकल्पना नाहींत. आत्म्याचा व निसर्गाचा अभ्यास व सूक्ष्म संशोधन यांच्यांतून हे सिद्धान्त निष्पन्न झाले आहेत. भौतिक जगांत कोणताहि संकल्प केव्हां व कोणत्या स्वरूपांत उद्‌भूत होतो हें आपल्याला सांगतां येत नाहीं. प्रारंभीं या जगांत त्या संकल्पाची सिद्धि स्वप्नवत्, असंभवनीय वाटते. पण शनैः शनैः त्याची सिद्धि शक्य कोटींतील आहे, हें मानवी मनाला पटूं लागतें व अखेर एक दिवस तो संकल्प सिद्ध होतो.

आधुनिक जगांतील अणुबॉम्ब, हैड्रोजन बॉम्ब, रॅकेटस् यांच्याइतक्याच प्रभावी वायवास्त्र, अग्न्यस्त्र इत्यादि अस्त्रांचीं आपण महाभारतांत वर्णनें वाचतों. महाभारतांत कल्पतरूचें वर्णन केलें आहे. या गोष्टी त्या वेळीं प्रत्यक्ष होत्या असें जरी आपण ऐतिहासिक दृष्ट्या सिद्ध करूं शकलों नाहीं तरी, ही गोष्ट तितकीच सत्य आहे कीं, त्या कालच्या मानवानें या गोष्टींचा संकल्प केला होता व त्यांचा विचार केला होता आणि या गोष्टी प्रत्यक्षांत आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्ती सर्व कालखंडांत होत्या. हजारों वर्षांपूर्वीं माणसानें केलेल्या संकल्पांना अगर वासनांना आज फळ आलें आहे. 'देव आकाशांत विमानांतून संचार करीत आहेत' हें वर्णन पुराणग्रंथांतून सर्वसामान्य आहे. आज माणसें विमानानें हवेंतून प्रवास करीत आहेत.

त्याचप्रमाणें 'सत्यमेव जयते', 'पाप नाशच करील (Evil shall bring destruction)', 'तत्संनिधौ वैरत्यागः' (अहिंसक योग्याच्या सान्निध्यांत प्राणिमात्र वैरत्याग करतील)—असेहि संकल्प माणसानें केले आहेत. माणसाच्या सुकृताचा व दुष्कृताचा जगावर सारखाच परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं, हें अपरिहार्यच आहे. ही श्रद्धा, धर्मभोळेपणा अगर अंधळेपणा नाहीं. ही डोळस श्रद्धा असून शास्त्रीय सत्य आहे. 'Law, i.e. the rationalized explanation of any phenomenon, is ultimately Will—whether good or bad, wise or crude, regular or spasmodic'. म्हणून माणसानें सत्य व शिव संकल्प करावेत व 'सत्य संकल्पाचा दाता भगवान्' या श्रद्धेनें त्यांच्या सिद्धीसाठीं सतत उद्योगशील रहावें.

तेव्हां ईश्वराच्या रुद्र व शिव अशा दोन्हींहि स्वरूपांची मानवाला आज प्रतीति येत असली तरी








या विश्वाचें अंतिम स्वरूप सत्य, शिव व सुंदर आहे आणि भक्तिक्षेत्रांत ज्ञानेश्वरांनीं वर म्हटल्याप्रमाणें, ' कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । त तिहीं वैकुंठाचि केलें आघवें । ', शाश्वत अगर दीर्घकाल सुखाचा लाभ व्हावा म्हणून ब्रह्मलोकाला किंवा स्वर्गलोकाला एखाद्यानें जाण्याऐवजीं सर्वांसाठीं हा इहलोकच ब्रह्मलोक अथवा स्वर्गलोक बनवावा हासुद्धां मानवी आत्म्याचा एक असाच संकल्प आहे. येशूचें ' पृथ्वीवर ईश्वराचें राज्य ' वा गांधीजींचे ' रामराज्य ' स्थापन करण्याचे मनोरथ वरील संकल्पसिद्धीच्या प्रयत्नांतीलच प्रयत्न समजले पाहिजेत. मात्र न्याय, नीति, ' पृथ्वीवर ईश्वराचें राज्य ' वा ' रामराज्य ' या तत्त्वांचो व कल्पनांची सत्यता जीवसृष्टींतील फक्त मानव-कोटींतच संभवते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. गायीला आत्मा नाहीं, असें सर्व धर्म व ज्ञानी मानतात असें नाहीं. तथापि, गाईला आत्मा असला तरी त्याला मानवाच्या आत्म्याप्रमाणें ' स्वातंत्र्य ' नाहीं, हें सर्वच मानतात. सर्व गाई सारख्याच आहेत. गाईचा आत्मा समष्टिरूप असून तो भौतिक सृष्टींतील नियमांनीं व धर्मांनीं बांधला गेलेला आहे. गाईची उत्क्रांति अथवा विकास या नियमांनीं नियमित व निश्चित झाला आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं, माणसाचा आत्मा भौतिक नियमांचें व धर्मांचें उल्लंघन करून आपला विकास करूं शकतो. मनुष्य जें कांहीं करूं शकतो तें हें कीं, आपल्या आत्मस्वातंत्र्यानें तो या नियमांचें व धर्मांचें उदात्तीकरण ( sublimation ) करून तो एक नैतिक व आध्यात्मिक सृष्टि निर्माण करूं शकतो.

पण ब्रह्मप्राप्तीपासून अगर ईश्वरप्राप्तीपासून मिळणारा शाश्वत आनंद अथवा स्वर्गप्राप्तीपासून मिळणारें अशाश्वत सुख यांसाठीं या धर्मांचें पालन करणें अवश्य आहे हें जितकें सर्वमान्य आहे, तितकें या जगांतील सुखासाठींही तसेंच करणें जरूर आहे, हें मान्य नाहीं. उलट, तसें करण्यानें या जगांतील सुख मिळणें शक्य नाहीं, इतकेंच नव्हें तर सृष्टि-व्यापार चालविण्यासाठीं या धर्मांला अपवाद करणें जरूर आहे अशी शास्त्रांची व सत्पुरुषांची शिकवणूक आहे, अशी सर्व जनांची सामान्य समजूत आहे. पण तींच शास्त्रें व सत्पुरुष असें सांगतात कीं, या पृथ्वीवर पुन्हां कृतयुग अथवा सत्ययुग येणार म्हणजेच पृथ्वीवर ' ईश्वराचें राज्य ' अथवा ' रामराज्य ' होणार आहे व तेव्हां सर्व माणसें परस्परांशीं धर्मानें व्यवहार करूं लागणार आहेत. अशा प्रकारची स्थिति, माणसानें कसलाहि प्रयत्न न करतां, एक दिवस आपोआप येणार, ही गोष्ट बुद्धीला व तर्काला पटत नाहीं. एक दिवस माणसें धर्मानें व्यवहार करूं लागणार तर त्यासाठीं प्रयत्न केले पाहिजेत व या प्रयत्नांना योग्य फल यावयाचें तर त्याचा सम्यग् मार्ग शोधून काढला पाहिजे. या शोधांत कदाचित् शेंकडों, हजारों वर्षें जातील व मानवांच्या अनेक पिढया खपतील !

## अरविन्दांच्या साधनेचें साध्य

या मार्गाचा शोध करण्यासाठीं अरविंदांनीं चाळीस वर्षें एक स्थान व सव्वीस वर्षें स्थिर एकान्त-वास पत्करला ( अरतिर्जनसंसदि । ), त्यासाठीं त्यांनीं दिव्य योगसाधना केली. ईश्वराचें साक्षात् दर्शन घ्यावयाचें, या वेडानें भारावून गेलेल्या श्री-अरविंदांनीं सर्वसंगपरित्याग करून पांडिचरीचा रस्ता धरला. परंतु अन्य ईश्वर-दर्शनेच्छूंप्रमाणें स्वतःला शांति व आनंद मिळावा येवढेंच अरविंद यांच्या योगसाधनेचें लक्ष्य नव्हतें. त्यांनीं ४० वर्षें दीर्घ तप केलें तें, ज्याचा लाभ झाला म्हणजे दुसरें कोणतेंही सुख त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ वाटत नाहीं. ( यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ), अशा आत्यंतिक सुखाचा स्वतःला लाभ व्हावा या स्वार्थ-बुद्धीनें नव्हे. जीवन व त्याचा सर्व कर्मव्यापार यांचा आधार व प्रेरक तत्त्व एक आध्यात्मिक चेतना आहे अशी श्रीअरविंद यांची सानुभव श्रद्धा होती. सामान्य माणूस या चेतनेचें ग्रहणशील वाहन कसें बनूं शकेल, या चेतनेच्या जागिवेनें त्याची सर्व कर्मचेष्टा सहजपणें कशी होईल व त्याचें जीवन तिच्यामुळें अंतर्बाह्य कसें रूपांतरित होईल, याच्या शोधार्थ त्यांची सर्व योगसाधना होती. हें घडून येईल तर, पृथ्वीवरील घनदाट अज्ञानांध-काराचे ज्ञानप्रकाशांत रूपांतर होऊन तिच्यावर ईश्वराचें राज्य सुरू होईल. एका किंवा अनेक व्यक्तींनीं योगारूढ होऊन साक्षात् ईश्वराचें सांनिध्य, साधर्म्य







ची सायुज्यस्थिति प्राप्त करण्यानें अखिल मानव-जातीचा प्रश्न सुटत नाहीं किंवा तिचें शाश्वत कल्याण होत नाहीं. स्वर्गारोहण करून ईश्वरप्राप्ति करणें यांत खरें रहस्य नाहीं, तर ईश्वरालाच या पृथ्वीवर आणलें पाहिजे, अवतरविलें पाहिजे; आणि तेंहि मधून-मधून होणाऱ्या अंशावतार अथवा पूर्णावतार यांच्या रूपानें नव्हे. त्याचप्रमाणें एखाद्यादुसऱ्या प्रिय भक्ताच्या घरीं ईश्वर पाणी भरीत आहे यानें योगी अरविंदांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यांना, घरोघर सामान्य माणसांच्या रूपानें सर्वत्र ईश्वर वावरत आहे, अशी स्थिति इहलोकीं निर्माण करावयाची होती. साहजिकच आहे कीं, जर सर्व मानवांत सद्भावना नांदून पृथ्वीवर शांतीचें साम्राज्य प्रस्थापित करावयाचें व कृतयुगाला पुनः प्रारंभ करावयाचा तर ईश्वर अथवा चिच्छक्ति सार्वत्रिक होणें जरूरच आहे. म्हणून केवळ एखाद्या व्यक्तीनें आरोहण करून त्या चेतनाशक्तिस्वरूपाशीं तादात्म्य पावणें पुरेसें नाहीं. आजपर्यंत पुष्कळांनीं तसें करून आपलें मन शुद्ध केलें आहे व एकांत अनेकत्व, अनेकत्वात एकत्व याचा अनुभव घेतलेला आहे. तथापि, सामान्य माणसाचें मन अद्यापि अशुद्ध व मलानें बरबटलेलेंच राहिलें आहे. म्हणून ती शुद्ध चेतनाशक्ति भूतलावर सामान्य जगांच्या व्यवहाराच्या पातळीवर अवतीर्ण करण्याचें रहस्य साध्य झालें पाहिजे. तरच सामान्य माणसांचीं मनें उंच व व्यापक होतील, त्यांच्या व्यवहारांत सुसंवादित्व ( harmony ) उत्पन्न होऊन व्यवहार समतेच्या पायावर सुरू होईल. तेव्हांच जगांतील सर्व विसंवाद ( discords ) नष्ट होऊन त्या सर्वांचें एका सुसंवादित्वांत परिवर्तन होईल. तदनंतर ईश्वर केवळ आपल्या शिवस्वरूपानेंच जगावर राज्य करील व मानवाचें ' सत्य-शिव-सुंदर ' विश्वाचें स्वप्न साकार होईल. ईश्वराला संपूर्ण, शिव, सुंदर बनवावयाचें तर प्रथम माणसाला तसें बनलें पाहिजे. कारण जसा माणूस तसा त्याचा देव. माणसाच्या उत्क्रांतीबरोबर किंवा विकासाबरोबर त्याच्या देवाचीहि उत्क्रांति वा विकास होणें अपरिहार्यच आहे. माणसाशिवाय अन्य जड-व-जीवसृष्टीनें स्वानुभवावरून ईश्वराच्या स्वरूपाविषयीं कांहीं माहिती जमवून ठेविली नाहीं. कारण तिला जाणीव नाहीं. ईश्वराचें अस्तित्व व त्याचें स्वरूप यांविषयीचें ज्ञान फक्त माणसाच्याच नैतिक व आध्यात्मिक जाणिवेंतून जगाला झालेलें आहे. या जाणिवेंत जसा बदल होईल तसा ईश्वरांतही होईल हें मान्यच केलें पाहिजे.

श्रीअरविंद यांनीं आपल्या अवतारकार्याची समाप्ति ५ डिसेंबरला केली. २४ नोव्हेंबर १९२६ या दिवशीं त्यांना साक्षात् ईश्वरदर्शन वा सिद्धि प्राप्त झाली असें मानलें जातें व त्या दिवसापासून त्यांच्या आश्रमांत व आसमंतात् लोकांना एका अद्भुत अवस्थेच्या चेतनाशक्तीचा अनुभव येऊं लागला असें श्रद्धेनें सांगितलें जातें. अनेक वर्षांपासून २४ नोव्हेंबर हा सिद्धिदिवस म्हणून स्वतः अरविंद व त्यांचा शिष्यवृंद साजरा करीत हें प्रसिद्धच आहे. परंतु ही गोष्ट सत्य मानली तरी, तेवढ्यानें श्रीअरविंद यांचें अवतारकार्य पूर्ण झालें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण केवळ वैयक्तिक सिद्धि मिळविणें इतकेंच त्यांचें उद्दिष्ट नव्हतें, तर सामूहिक सिद्धीचा मार्ग शोधून काढणें हें त्यांचें मुख्य जीवन-कार्य होतें. श्रीअरविंद यांच्या आश्रमांत वास करणाऱ्या वा त्यांच्याशीं प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध ठेवणाऱ्या कांहीं माणसांच्या जीवनावर त्यांनीं प्राप्त करून घेतलेल्या शक्तीचा प्रभाव पडणें अपरिहार्यच होतें व तो त्याप्रमाणें पडला, असें कबूल करण्यास कांहींच हरकत नाहीं. परंतु त्यांच्या या प्रभावापासून सामान्य माणूस वंचितच राहिला, हेंहि तितकेंच मान्य करावें लागेल. या जन्मींचें अपुरें राहिलेलें काम पुरें करण्यासाटीं ( ' अनेकजन्मसंसिद्धः ' ) योगी अरविंद भारतांत पुन्हां जन्म घेणार नाहींत, हें कोणीं सांगावें ? मानवजातीच्या भविष्यकालीन पूर्णावस्थेविषयीं अचल श्रद्धा आणि संकल्प, तदनुसार नित्य नीतिधर्माचें निरपवाद पालन करण्याचा अखंड प्रयत्न करण्याची आवश्यकता इत्यादि गोष्टींविषयीं श्री अरविंदांची साधना व विचार यांचें संक्षिप्त दिग्दर्शन केलें. या प्रश्नाविषयीं गांधीजींच्या विचारांचें दिग्दर्शन पुढील लेखांतून करावयाचें योजिलें आहे.












प्राचीन भारताचा इतिहास आणि मार्क्सवादी दृष्टि : एक परिसंवाद

# कॉ. डांगे यांचें 'प्राचीन भारत'

[ कम्युनिस्ट पक्षाचे सुप्रसिद्ध विचारवंत आणि कार्यकर्ते कॉ. श्री. अ. डांगे यांच्या " India : from Primitive Communism to Slavery " ( १९४९) या अलीकडील पुस्तकांत श्री. डांगे यांनीं प्राचीन इतिहासावर केलेलें भाष्य, त्याची पद्धति व त्यावरून होणारें प्राचीन भारताचें दर्शन हीं इतकीं धक्के देणारीं व वादग्रस्त आहेत कीं, इतरांनींच नव्हे तर खुद्द कांहीं पौरस्त्य व पाश्चात्य विद्वान् मार्क्सवाद्यांनींहि कॉ. डांगे यांच्या संशोधनपद्धतीबद्दल व त्यांनीं काढलेल्या निष्कर्षांबद्दल नापसंती व्यक्त केली आहे. म्हणूनच कॉ. डांगे यांच्या या पुस्तकाचें तज्ज्ञांकडून अभ्यासपूर्वक मूल्यमापन होणें आजहि अगत्याचें आहे. त्याच दृष्टीनें श्री. ना. गो. चापेकर आणि श्री. दि. के. बेडेकर यांनीं आपापल्या भिन्न दृष्टिकोनांतून केलेलें या पुस्तकाचें समीक्षण पुढें दिलें आहे. तें वाचकांस निःसंशय उद्बोधक व महत्त्वपूर्ण वाटेल. ]

## १. प्राचीन भारतीय इतिहास आणि मार्क्सवाद यांची एक कंथा

श्री. ना. गो. चापेकर

'प्राथमिक अथवा अतिप्राचीन कालच्या सामायिकत्वापासून तों गुलामगिरीपर्यंतचा हिंदुस्थान' ह्या नांवाचें एक इंग्रजी पुस्तक डांगे यांनीं प्रसिद्ध केलें आहे. 'प्राथमिक सामायिकत्व' हा शब्द मीं इंग्रजी 'प्रिमिटिव्ह कम्यूनिझम' ह्या अर्थानें योजिला आहे. डांगे हे हिंदुस्थानांतील एक प्रमुख साम्यवादी म्हणून गणिले जातात. परंतु गुलामगिरी या शब्दाच्या पिशाचानें त्यांना इतकें पछाडलें आहे कीं, ते स्वतःच त्याचे गुलाम बनले आहेत. 'गुलामगिरी' शब्द नाहीं असें एक पानहि ह्या पुस्तकांत आढळणें वाचकाला कठिण पडेल !

मार्क्सचीं तत्त्वें हिंदुस्थानच्या इतिहासाला लागूं करून दाखविण्याचा डांगे यांनीं संकल्प सोडला. आतां ही प्रतिज्ञा पुरी कशी करावयाची, हा पेंच पडणें स्वाभाविकच होतें. डांगे यांनीं सर्व श्रौत, स्मार्त, पौराणिक वाङ्मय पालथें घातलें; कौतुकास्पद कल्पना लढविल्या. ह्या प्राचीन वाङ्मयांत त्यांना मार्क्सच्या ग्रंथांतील खुणा आढळल्या. लगेच त्यांनीं ह्या खुणा एकत्र करून एक कंथा तयार केली व तिला इतिहास हें नांव दिलें ! मार्क्सच्या तत्त्वज्ञानांत गुलाम व त्यांच्या श्रमावर जगणारे आयतखाऊ असे दोन वर्ग वर्णिले आहेत.







हिंदुस्थानच्या इतिहासांत हे दोन वर्ग शोधून काढणें अपरिहार्य ठरलें. त्याप्रमाणें ब्राह्मण-क्षत्रिय हे आयतोबा आणि त्यांच्याकरितां राबणारे गुलाम वैश्य व शूद्र. शूद्रांनींच क्रांति केली. मार्क्सनें कामगार हाच क्रांतिकारक असतो, असें म्हटलें आहे ना? ब्राह्मण-क्षत्रिय यांची भांडवलशाही संस्कृति हीन दर्जाची. शूद्र हा खरा सुसंस्कृत. राम पाहा; त्यानें शूद्राला ठार मारिलें. उलट, कर्ण इतका उदार कां? तो कोळयाच्या घरांत वाढला म्हणून. भांडवलशाहीचें दुसरें एक चिह्न आहे. तें म्हणजे स्त्रीचें बटकीकरण. प्रथमतः स्त्रीचें स्थान उच्च होतें. ती शासक होती. ती स्वतंत्र होती. समाजाचें, गणाचें नेतृत्व तिच्याकडे होतें. ह्या स्थानावरून भांडवलवाल्या ब्राह्मण-क्षत्रियांनीं तिला खेंचून काढली आणि पुरुषाची गुलाम बनविली. मातृप्रधान संस्था मोडून पितृप्रधान संस्था ह्या धूर्तांनीं स्थापिली. ती पूर्वीं गणिका होती. तिला एका पुरुषाच्या माथीं मारून त्याची दासी केली!

मार्क्सदर्शनांतील एक सिद्धान्त ग्रंथकारानीं प्रतिपादिला आहे. जगांत उत्पादन व उत्पादनशक्ति हींच सर्व ऐतिहासिक घडामोडींचीं निर्णायक कारणें होत; हाच तो त्रिकालाबाधित सिद्धांत. आतां, डांगे यांची अलौकिक तर्कशक्ति, त्यांचे अचाट परिश्रम, त्यांचा धनत्तर कल्पनाविहार ह्यांची वाचकांना ओळख करून देण्याकरितां कांहीं उदाहरणें देणें अवश्य आहे:

युगें (चार युगें—कृत, त्रेता, द्वापर आणि कलि) हिंदूंच्या सामाजिक इतिहासांतील चार टप्पे होत. कृतयुग हें मनुष्य रानोमाळ भटकत होता, तेव्हांच्या स्थितीचें निदर्शक होय (कृतं संपद्यते चरन्); कृतयुगांत मनुष्य रानटी स्थितींत होता. ह्या दगडी हत्यारांच्या काळांतून मनुष्य पुढें जातो, तेव्हां तो धनुष्यबाण वापरतो; विस्तव पेटवितो; गाई-बैल पाळतो—कांहींसा स्थिर होतो; हें त्याचें त्रेतायुग म्हणावयाचें (उत्तिष्ठन् त्रेता भवति). द्वापरयुगांत धातू वापरण्यांत येऊं लागल्या ह्या युगाला डांगे आपल्या कल्पनेशीं कसें जोडून घेतात, हें मला नीट समजलें नाहीं. ज्याला सुधारणा म्हणतात तें कलियुग होय. भारतीय युद्धाच्या वेळीं कलियुगाला सुरुवात झाली म्हणून ते इतिहासाचे दोन भाग पाडतात: पहिला भारतीययुद्धपूर्व व दुसरा युद्धोत्तर. ही युगांची कल्पना डांगे यांनीं आपल्या सांच्यांत बसवून घेतली आहे.

'यज्ञ' हा एक उत्पादनाचा प्रकार आहे. य+ज+न ह्या तीन अक्षरांचा 'यज्ञ' शब्द बनला आहे. य म्हणजे जाणें; ज=उत्पन्न करणें (धान्य व प्रजा); न हा प्रत्यय. (औपमन्यवी व्युत्पत्ति पहा: औपमन्यव ह्या अक्षरांपासून अजिन शब्द बनवतात, यज्ञांत अजिनें वापरतात म्हणून यज्ञ हें अजिनाचें रूपांतर.) अग्नीच्या शोधामुळें यज्ञक्रिया अस्तित्वांत आली. 'हवन' हा एक अन्नाची वांटणी करण्याचा प्रकार आहे. 'दान' म्हणजे दक्षिणा अथवा धर्मदाय नव्हे; दान म्हणजे संपत्तीची विभागणी. 'सत्र' हा सांघिक उद्योगाचा प्रकार. सत्रांत सर्व एकाच गोत्राचे; सर्वच ऋत्विज् व सर्वच यजमान. सत्रांत बायकाहि भाग घेत; सर्वजण एकाच पात्रांतून सोमरस पीत (समाख्या). यज्ञांत स्त्री-पुरुष नाचत, बागडत, मजा करीत.

गण, जन, गोत्र ह्या तिहींचा अर्थ एकच. इंग्रजींतील 'कम्यून' शब्दाशीं हे शब्द समानार्थी आहेत. गणसंस्था ही मातृप्रधान होती: "The organization is a gen organization based on Matriarchy" (पान ४१). मूळ लॅटिन शब्द जेन्स (gens) आहे. डांगे यांनीं 'जेन' शब्द नवीन बनविलेला दिसतो. मूळच्या शब्दांतील 'स्' अक्षर बहुवचनाच्या प्रत्ययार्थीं त्यांनीं धरलें असावें. जसें जनाः—जनासः (बहुवचन, जन शब्दाचें). परंतु जेन किंवा जन (gen) हें मूळ प्राचीन पाश्चात्य भाषांत असल्याचें मला माहीत नाहीं. आपल्या सिद्धान्तसमर्थनाकरितां डांगे यांना भाषाहि बनवावी लागली. 'जन' व 'जेन्स' मधील अक्षरसाम्य त्यांना पुरें झालें. असो. त्यांच्या कल्पनेच्या भराऱ्या अजून आपणांस पुष्कळच पहावयाच्या आहेत.

प्राचीन कालीं सर्व 'गण' अग्निहोत्री होता. गणान्तर्गत विवाह होत म्हणजे सगोत्र विवाह विहित होते. गणांतील स्त्रीला 'जनि' ही संज्ञा असे; मुलें उत्पन्न करते ती 'जनि'. तिच्या मुलांना 'जन' म्हणत. मुलें गणाचीं असत. तीं पुढें बापाचीं झालीं. गणापत्याचा पितुःपुत्र झाला. असिक्नीला

५००० मुलगे झाले ते सर्व गणाचे मिळून होते. ' गण ' व ' जन ' ह्या दोहोंचा अर्थ प्रजोत्पादन करणें. पुरुषांना अन्न वांटून देऊन प्रजोत्पादनाला समर्थ करणारी ती माता. गणापत्याला दुसरा शब्द ' गोत्रापत्य ' होता. तसेंच, इंग्रजी ' कम्युन् ' ह्या शब्दानें जें आपण समजतों तेंच ' ब्रह्मन् ' शब्दानें समजावयाचें. गोत्रापत्यें हीं सर्व गोत्राचीं मुलें. त्यांचा जनक निश्चित करतां येत नाहीं. आई मात्र निश्चित. गण आयुधजीवी म्हणजे सशस्त्र असत. स्त्रीपुरुषसंबंध हे वैयक्तिक नसून सामाजिक असत. म्हणून ते समाजाच्या त्या त्या वेळच्या परिस्थित्यनुरूप नलत. विवाहसंस्था कृत्रिम आहे. गणांतील पुरुष आणि स्त्रिया म्हणजे नवरे व बायका हा संबंध ' अर्धनारीनटेश्वर ' ह्या शब्दानें व्यक्त होतो. खासगी मालकी अस्तित्वांत येतांच एकपत्नीविवाह अस्तित्वांत आला. शांतिपर्वांत खालील वचन आहे :

(कृतयुगे) "न चैषां मैथुनो धर्मो बभूव भरतर्षभ।
संकल्पादेव चैतेषां गर्भः समुदपद्यत ॥
ततस्त्रेतायुगे काले संस्पर्शाज्जायते प्रजा।
न ह्यभून्मैथुनो धर्मस्तेषामपि जनाधिप ॥
द्वापरे मैथुनो धर्मः प्रजानामभवन्नृप।
तथा कलियुगे राजन्द्वन्द्वमापेदिरे जनाः ॥"

ह्यामध्यें संकल्प, संस्पर्श व द्वंद्व हे शब्द सोपे असले तरी त्यांनीं प्रजोत्पत्ति कशी झाली किंवा होत असे, हें समजण्यास कठीण आहे. डांगे यांनीं त्या शब्दांची फोड केली आहे. संकल्प म्हणजे मनसोक्त अनिर्बंध विषयोपभोग. सगोत्र विवाह बंद पडून निरनिराळ्या गोत्रांत सांघिक विवाह होऊं लागले; हा अर्थ संस्पर्श-शब्दाचा समजावयाचा. बायकोवर नवऱ्याची सत्ता सुरू झाली; बायको नवऱ्याच्या पूर्णपणें अधीन झाली, ही स्थिति द्वंद्व शब्दानें व्यक्त होते. मैथुन शब्द समजणें अवघड नाहीं असें कोणाला वाटल्यास तो भ्रम आहे. डांगे काय सांगतात पाहा. इच्छेस येईल तावत्काल स्त्री-पुरुषांनीं एकत्र राहावयाचें; इच्छेस येईल तेव्हां संबंध तोडून अलग व्हावयाचें; ह्या स्थितीचा द्योतक मैथुन शब्द आहे ! योनिजन्म हा सामान्य मानव-जातीचा. देवादिक अयोनिज ही प्राचीन समजूत. हिला उद्देशून संकल्पानें गर्भधारणा होत असे, असें म्हटलें आहे. डांगे यांना ब्रह्मदेवाचे मानसपुत्र माहीत नाहींत असें कोण म्हणेल ! पण त्यांनीं तिकडे बुद्ध्या दुर्लक्ष केलें. ही इतिहासकाराची वृत्ति नाहीं. येशुसुद्धां अयोनिज समजतात. त्यासंबंधानें डांगे यांचें काय म्हणणें आहे, तें समजण्यास मार्ग नाहीं.

आर्यगणांनीं हिंदुस्थानांत आल्यावर अनेक वर्षांनंतर वर्णव्यवस्था, खाजगी मिळकत, शूद्रांची गुलामगिरी इ. प्रकार सुरू केले. मध्यआशियांतून असुरांपासून ( इराणी लोकांपासून ) निघून पूर्वेस हिंदुस्थानांत आर्यगण येत होते तेव्हां त्यांच्यांत स्त्रीस्वामित्व होतें. असुर अधिक सुधारलेले होते. वैराज्यांत माझें-तुझें नसतें. अर्थात् गुलामगिरी नाहीं म्हणून शूद्रहि नाहींत. स्वराट् म्हणजे उमरावांचें आधिपत्य.

गीतेंत कर्मयोग नाहीं व संन्यासयोगहि नाहीं. गुलामांनीं आपल्या गुलामगिरींत आनंद मानावा म्हणून गीतेचें तत्त्वज्ञान निर्माण झालें. गुलामांनीं समाधानानें राहावें म्हणून धनिकांचे गोडवे गाण्यांत येऊं लागले. " धनिनं पूजयेन्नित्यम् " असा शास्त्रनियम करण्यांत आला. अशा तऱ्हेनें सवर्ग समाजांत शास्त्र बनत असतें. भांडवलशाहीला टिकवून धरणारें आचारधर्माचें शास्त्र व गुलामगिरीला प्रोत्साहक व पोषक असें तत्त्वज्ञान ह्यांची उपपत्ति अशा तऱ्हेनें लावितां येते. परंतु इतकें करूनहि अखेरीस श्रीमंतांसाठीं जन्मभर राबणारी दासवृत्ति उशी खाल्ल्याशिवाय कशी राहणार ! परीक्षिताला नागांनीं ठार केलें; कृष्णाला व अर्जुनाला पाणी पाजलें ! कृष्णानें नारदाचा उपदेश ऐकला नाहीं; दानांनीं गरीब लोकांस संतुष्ट टेविलें नाहीं. त्यामुळें कृष्ण ज्यांच्या म्होरक्या होता अशा यादवगणांतील द्रव्यपुष्टांना निर्धन यादवांनीं चीत केलें. कृष्णाचा मुलगाच त्याच्या विरुद्ध उठला. कृष्णार्जुनांची अखेर जी दुर्दशा झाली, ती अनुकंपनीय होती. डांगे म्हणतात, भांडवलवाल्यांची दैना कशी उडते हें पाहावयाचें असेल तर, महाभारतांतील उंदराची गोष्ट वाचा आणि मोठमोठ्या धनाढ्य व








गुणाढ्य तालेवंतांची कशी टर उडविली जाते ह्याचें मनन करा : धर्मराजानें केलेल्या अश्वमेध-यज्ञांत, सभागृहांत ज्याचा अर्धा देह सोन्याचा आहे असा एक उंदीर घुसला. सर्वांचें लक्ष त्या अद्भुत उंदराकडे गेलें. अर्धें शरीर सुवर्णाचें कसें झालें ह्या सदस्यांच्या कुतूहलपूर्ण अन्वेषणेचें उत्तर उंदरानें काय दिलें पहा. तो म्हणाला "मी एका भिकारड्याच्या झोंपडींत गेलों. त्या दरिद्री नारायणाकडून मला थोडें तरी खाद्य मिळालें आणि माझें निम्में शरीर सुवर्णमय झालें. पण येथें पाहतों तों ब्राह्मण, ' धालेपणाची ढेकर ' देत असून त्यांचीं ताटें पक्वान्नांनीं भरत आहेत आणि मला मात्र रित्या पोटानें परतावें लागत आहे. त्यामुळें माझा हा अर्धा देह सोन्याचा न होतां पूर्ववत् राहिला !" धर्माच्या ज्या सद्गुणांचा त्रिभुवनांत डंका वाजत आहे त्या सद्गुणांची डांगे यांच्या मतें एका निर्बुद्ध क्षुल्लक प्राण्यानें रेवडी उडविली !

मार्क्सच्या ( डांगे यांच्या ? ) डोळ्यांनी पाहिलें असतां आपल्या प्राचीन इतिहासाचें चित्र कसें दिसेल, ह्याचा नमुना येथवर आपणांस पाहावयास मिळाला. आतां डांगे यांचा भाडोत्री चष्मा जरा बाजूस ठेवून आपण आपल्या असहाय दृष्टीला काय दिसतें, तें पाहूं :

समाजाविषयीं लिहितांना मानवेतिहास व समाजेतिहास ह्यांतील भेद ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. मानव निर्माण कोठें झाला ? एके ठिकाणीं अथवा अनेक ठिकाणीं मनुष्याची निर्मिति झाली, ती निर्मिति एकदम झाली कीं ठिकठिकाणीं, कालांतरानें झाली ? ह्याविषयीं निश्चयपूर्वक आज मानवशास्त्राला कांहींच बोलतां येत नाहीं. सध्यां विकासतत्त्वानुसार माकडापासून मनुष्याची उत्पत्ति झाली असें बहुशः मानलें जातें. ह्याचा अर्थ आजच्या माणसाला माकडिणीनें प्रसूत होऊन जन्म दिला, असा नव्हे !

माकडाला मनुष्याचें स्वरूप प्राप्त होण्याला कित्येक सहस्र वर्षें लोटलीं असलीं पाहिजेत. तसेंच, माकड आणि मनुष्य ह्यांच्या दरम्यान् धड माकड नाहीं व धड मनुष्य नाहीं अशीं अनेक स्वरूपें आपण कल्पिलीं तरी, तें चुकणार नाहीं. माकडाचा मनुष्य बनणें म्हणजे मेंदूचा विकास होणें होय. हा विकास होण्यास कालावधि लागणार हें सांगावयास नको. आतां स्त्री-माकड व पुरुष-माकड ह्यांच्या मेंदूत फरक असेल; म्हणजे नर-माकडाचा मेंदू मादी-माकडाहून अधिक विकसित झालेला असेल, तर मनुष्यत्व संपादन केलेली पुरुषसंख्या स्त्रीसंख्येहून अधिक असण्याचा संभव आहे. अशा ह्या पुरुषांना स्त्रिया मिळणेंहि कठिण. कदाचित् अमनुष्य स्त्रीमाकडाबरोबर संग करण्याचा प्रसंगहि येत असेल. शिवाय पायांवर चालणारा माकड-मनुष्य झाडाच्या ढोलींत राहात असल्यास त्याच्या विषयक्रीडेला अनेक स्त्रिया मिळणेंहि दूरापास्तच. ह्यामुळें त्या अवस्थेंतील मनुष्याच्या कामप्रवणतेला स्वाभाविक मर्यादा पडत असली पाहिजे. आणखी एक विचार करण्यासारखी गोष्ट म्हणजे ह्या परिस्थितींतील अर्धनरनारींना सहवास व सहकार्य केल्याविना गत्यंतरच नाहीं. एक पुरुष व एक स्त्री ह्यांच्या आजन्मसहवासानेंच मेंदूचा विकास झपाट्यानें होण्याचा संभव. स्त्रीशिवाय पुरुषाला पूर्णत्व नाहीं, ही कल्पना ह्या अनुभवानेंच सुचली असावी. ह्यावरून एक-पति-पत्नीत्व अथवा दापत्य हीच नैसर्गिक स्थिति होय, असें अनुमान केल्यास तें अगदींच वावगें होणार नाहीं.

अशा ह्या जोडप्याला मुलें होणार. त्यांत मुलगे व मुली असणारच. निसर्गजन्य प्रेमामुळें ह्या मुलांचें संगोपन बराच कालपर्यंत आई-बापांना केल्यावांचून गत्यंतर नाहीं. ह्या परिस्थितींतून कुटुंबभावना निर्माण होऊन कुटुंबसंस्था बनत जाते. अजून विवाहाची कल्पना उदय पावलेली नाहीं. अद्यापि हा मानव पाशवी वृत्तीचा आहे. तेव्हां एकाच गुहेंत राहणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं-बहीणभावांनीं परस्परांत विषयवासना तृप्त करून घेणें अपरिहार्य व स्वाभाविक होतें. कारण विषयवासना ही शारीरिक गरज आहे. आतां जोडप्यापैकीं बायको मेली; मुलगी मोठी आहे; बाप तरुण आहे; अशा स्थितींत बापाचा लेकीशीं व्यवहार झाल्यास नवल नाहीं. बायकोच्या ऐवजीं पुरुष मयत झाला; बायको तरुण आहे; एक मोठा मुलगा आहे, अशा प्रसंगीं मातृपुत्रसंबंध कां घडणार नाहीं ? निसर्गावांचून दुसरें कोणतेंहि बंधन नाहीं. ह्यालाच आमच्या पुराणकारांनीं







'गोधर्म' ही संज्ञा योजिली आहे. "पिता यत्र दुहितुः सेकम् ऋंजन् (प्रसाधयन्—सायन)"; तसेंच, "न जामये तान्वो रिक्थम् अरैक् चकार गर्भं सनितुर्निधानम्" (ऋ. ३-३१-२) हीं वचनें उपरिनिर्दिष्ट अवस्थेला उद्देशून लिहिलेलीं असण्याचा संभव आहे. बाप मुलीच्या ठिकाणीं रेत स्थापित करितो, भाऊ बहिणीच्या ठिकाणीं गर्भ स्थापना करितो—असा ह्या ऋग्वेदांतील दोन वचनांचा भावार्थ आहे. बाप मुलीला व भाऊ बहिणीला पति पाहून देतो असा अर्थ टीकाकार करितात; तथापि मी येथें केल्याप्रमाणें अर्थ करणें अधिक बरोबर होईल. कारण हा अर्थ शब्दांना धरून आहे. मानवीकरणाच्या ह्या काळांत अशीं कुटुंबें पृथक् पृथक् राहात असलीं पाहिजेत. कुटुंबसंस्था ही मनुष्यीकरणाच्या क्रियेंतील एक आवश्यक घटना असल्याकारणानें ती नैसर्गिक आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. मानवेतिहासांतील हा पहिला टप्पा आहे. माकड फलाहारी व एकपत्नीक असतो. मनुष्यत्वाचीही पूर्वतयारीच निसर्गानें केलेली दिसते. हें जें माकडापासून बनत चाललेल्या मनुष्याचें वर्णन केलें आहे, तें आनुमानिक आहे, हें सांगावयास नको. कारण असा मनुष्य अजून आढळला नाहीं व आढळण्याचा संभव नाहीं.

संशोधकांना मनुष्य अगदीं पूर्वावस्थेंत असलेला आढळला तो समाजान्तर्गत होता. संशोधकांना प्रथमावस्थेंतील समाज आढळले; एकाकी व्यक्ती आढळल्या नाहींत. समाज म्हणजे कळप नव्हे ह्या गोष्टीचा विसर पडला नाहीं तर, समाजाचें वैशिष्ट्य समजण्यास सोपें जाईल. समाज आपोआप बनत नाहीं. आपआपली सोय साधण्यासाठीं संकेतानें किंवा गर्भित करारानें संघ करून माणसें राहतात. त्याचप्रमाणें ह्या समाजाचा घटक कुटुंब असतें; व्यक्ति नसते. संशोधकांना व्यक्तिसंघ सांपडले नाहींत. कुटुंबसंघांशींच त्यांचा प्रथम परिचय झाला. हिंदुस्थानांतील खेडयांकडे पाहिलें तर एका आडनांवाच्या कुटुंबांनीं वसलेलीं तीं आढळतील. एका गांवांतील सर्व कुटुंबें बहुधा एका कुळीचीं म्हणजे एका मूळ पुरुषाचीं वाढ झालेलीं अशीं असतात. संघ करून राहण्यांत स्वसंरक्षणाची इच्छा बलवत्तर असते. एकाकी राहण्यांत धोका असतो, हें उघड आहे. माकडांच्या अवस्थेंत बरेंचसें निर्भय असतें. ह्याच्या उलट निःशस्त्र मनुष्याला सर्व बाजूंनीं भय. संघाचें साहाय्य हीच त्याची प्रथमावस्थेंतील शक्ति. अशा संघांना गण म्हणत. व्यक्तींतून कुटुंब उद्भवलें. कुटुंबांतून संघ अथवा गण निर्माण झाला. व्यक्ति म्हणजे मनुष्य आणि कुटुंब व गण ह्यांत कांहींसा फरक आहे तो विचारांत घेणें अवश्य आहे. मनुष्य मूर्त व दृग्गोचर वस्तु आहे. कुटुंब व गण हीं बऱ्याच अंशानें बुद्धिगम्य किंवा कल्पनारूढ आहेत. तथापि कुटुंब व गण दोघांचेंहि विशिष्ट गुणधर्म असल्यामुळें ह्या संघातांचा व्यक्तीप्रमाणें विचार करावा लागतो.

'गण' व 'गोत्र' ह्यांत थोडा भेद आहे. 'गण' शब्द मनुष्यसंघाला उद्देशून लावितात. गोत्र शब्दानें प्रथम भूमीची कल्पना मनांत येते. गो म्हणजे भूमि. 'गोत्र' शब्दाचा अर्थ शेत-रान असा कोशकार देतात. गोत्र म्हणजे वसाहत. पुढें वसाहतींत राहणाऱ्यांनाहि गोत्र शब्द लावण्यांत आला. ह्याप्रमाणें गणगोत्रांचा, न्यायभाषेंत बोलावयाचें झालें तर, नित्यसंबंध आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. गणाव्यतिरिक्त गोत्र नाहीं व वसाहतीचें स्वरूप ज्याला नाहीं, तेथें 'गण' संज्ञा उचित होणार नाहीं. गण शब्द सामाजिक तर गोत्र शब्द प्रादेशिक.

गणाचा घटक कुटुंब आहे असें मानिलें म्हणजे गणांतील सर्व पुरुष गणांतील सर्व स्त्रियांचे नवरे ही कल्पना त्याज्य ठरवावी लागेल. कारण, कुटुंब शब्दानें पुरुष, त्याची कुटुंबिनी व दोघांचीं मुलें ह्याचा बोध होतो. मुलगे मोठे असल्यास त्यांच्या बायकांचाहि कुटुंबांत समावेश होणें स्वाभाविक आहे. स्त्रीपुरुषांचा पति-पत्नीभाव नसल्यास (तो धार्मिक विधीनेंच पाहिजे असें नाहीं) त्या संबंधास अगर व्यक्तिसमूहास कुटुंब शब्द लावणें अप्रयोजक ठरेल. ह्या कुटुंबांत एका पुरुषाच्या एकाहून अधिक बायका असणें असंभवनीय नाहीं. ज्या असतील त्या ठराविक असणार एवढेंच.

ह्यानंतर डांगे यांची लाडकी गणसंस्था कोणत्या परिस्थितींत अस्तित्वांत येते तें पाहूं. आज असे










समाज अस्तित्वांत आहेत, त्यांचा विचार केल्यास आपल्या प्रश्नांचें उत्तर मिळूं शकेल. उत्तर-ध्रुवाकडील बर्फाच्छादित प्रदेशांत लोक कसे राहात असतील ह्याची कल्पना करावी. धान्य पेरण्यासाठीं सोय नाहीं; झाडें वाढत नाहींत; मांस खाण्याला पशुपक्षीहि नाहींत. अशा ठिकाणीं राहणारे लोक समुद्रांतील माशांवर आपला उदरनिर्वाह करितात. समुद्रांतील मासे मोठे असतात. ते पकडण्यास अनेकांचें साहाय्य लागतें. शिवाय एका माशाचें खाद्य अनेकांना पुरेल इतकें असतें. अशा स्थितींत सर्वांना एकत्र राहणें भाग पडतें. निरनिराळीं घरें बांधणें अशक्य असल्यामुळें सर्व स्त्रीपुरुषांना एका घरकुल्यांत राहिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. येथें डांग्यांना अभिप्रेत असलेली गण-व्यवस्था आपल्या अनुभवाला येईल. ह्या लोकांत स्त्री-पुरुषसंबंध अगदीं शिथिल असतात. तात्पर्य, सर्व माणसांना एक घर, एकत्र खाणें, पिणें, निजणें, बसणें, सर्वांचे आर्थिक हितसंबंध एकाच मुशींत ओतलेले—इत्यादि.

मलाया द्वीपकल्पांत सिमँग लोक दाट जंगलांत राहतात. अर्थात् त्यांचा निर्वाह कंदमुळांवर, फळफळांवर असतो. मोकळी जागा फारच थोडी. शिवाय कंदमुळें सतत न पुरणारीं. त्यामुळें ह्यांचा मोठा समुदाय एकत्र व कायमचा एके ठिकाणीं राहणें अशक्य. ह्या लोकांचे लहानलहान गट असतात. सारांश, भौगोलिक व आर्थिक परिस्थित्य-नुरूप ह्यांची राहणी व जीवनक्रम बनलेला आहे. बोर्निओ बेटांत मरुत नांवाचे लोक आहेत. ह्यांच्या पाठीवर लांब शेपटीच्या वानरांसारखें कातडें असतें. मरुत मनुष्य दुरून माकडासारखा दिसतो.

स्त्री व पुरुष ह्यांच्यामधील कार्यविभागणी अगदीं पहिल्यापासून झाली असल्याचें आढळतें. पुरुष हा संपादक व स्त्री घरजोगवणी करणारी. स्त्रिया शिकारीला गेल्याचें उदाहरण नाहीं. घरकाम हेंच त्यांचें प्रायः मुख्य कर्तव्य. ह्या कार्यभेदामुळें एका पुरुषाला एक निश्चित स्त्री व एका स्त्रीला एक निश्चित पुरुष, ही व्यवस्था नैसर्गिक असली पाहिजे. जीवरक्षणाला ही व्यवस्था पोषक व अनुकूल आहे. ह्यांत पातिव्रत्य वा पत्नीव्रत्य कडक रीतीनें पाळलें न जाणें संभवनीय आहे.

काश्मीरमधील लदकसारख्या प्रांतांत अन्नटंचाई-मुळें प्रजोत्पादनाला मर्यादा घालणें प्राप्त होतें. डोंगराळ प्रदेश; सपाट जागेचा संकोच; तशांतहि बर्फाचें सर्वत्र वेष्टण. अशा स्थितींत कुटुंबांत एकच बायको आणून प्रजोत्पादनाला आळा घालण्याची युक्ति निघाल्यास नवल नाहीं. परंतु ही रूढि सर्व भावांमिळून एकच बायको करण्यापुरती होती. डांगे म्हणतात त्याप्रमाणें गणपुरुषांच्या समान बायकांचें उदाहरण आढळत नाहीं. बायको ही मत्ता म्हणून समजण्यांत येई. एकत्र कुटुंबाची मिळकत जशी सामायिक, तद्वत् स्त्रीहि सामायिक. ही समाईक स्त्री-त्वाची चाल सररहा होती. तिचे अवशेष अनेक जातींत प्रचलित रूढींवरून उमगण्यासारखे आहेत. उदा०, एखाद्या स्त्रीचा नवरा मयत झाल्यास तिला पुनर्विवाहाची इच्छा असल्यास दिराबरोबरच तिला विवाह करावा लागतो. त्याच्या परवानगीवांचून परकीयांशीं विवाह करतां येत नाहीं. कांहीं नाग-लोकांत मयत नवऱ्याचा कोणी आप्त विधुर नस-ल्यास विधवेला विधवा स्थितींतच रहावें लागतें. भावांमिळून एक बायको, त्याचप्रमाणें सर्व बहिणीं-मिळून एक पति—ही चाल एका काळीं अस्तित्वांत असावी. मात्र ह्या दोन्हीहि चालींची व्याप्ति भावांच्या पलीकडे नाहीं हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

सर्व सृष्ट पदार्थ मनुष्यमात्राच्या उपभोगार्थ आहेत अशी ईश्वरी योजना दिसते. कदाचित् निसर्गाचाच तो नियम आहे, असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. त्याप्रमाणें मनुष्यांत स्त्री ही पुरुषाची उपभोग्य वस्तु. ह्या समजुतीच्या पोटीं अनेक चाली जन्मास आल्या. त्यांपैकींच आपणांस अत्यंत प्रिय असलेली जी बायको तिला पाहुण्याच्या भोगार्थ देण्याची चाल होय. ही चाल प्राचीन काळीं सर्व समाजांत रूढ होती.

आसुर विवाहांत मुलीचे पैसे घेतात. ह्या चालीचा उगमहि मुलगी ही मिळकत आहे ह्या कल्पनेंत आहे. मुलीचा मोबदला तिच्या बापाला दिला, कीं ती मुलगी विकत घेण्यासारखें झालें. विकत घेतलेल्या बायकोची लायकी मोलकरणीसारखी मानली जाणें साहजिक आहे. एकपतिविवाहपद्धति अस्तित्वांत आणून पुरुषांनीं स्त्रियांना गुलामगिरींत टाकलें हा

## कॉ. डांगे यांचें 'प्राचीन भारत'

डांग्यांचा आग्रह अप्रमाण ठरेल. बापाच्या घरींच तिला परवशता प्राप्त होऊन गृहकृत्याकरितां राबणारी अशा दर्जाला ती पोंचली होती. पुरुष-प्रधान कुटुंबव्यवस्थेंत बायको गुलाम झालीच पाहिजे हा सिद्धान्त जर निरपवाद मानावयाचा तर मातृप्रधान कुटुंबव्यवस्थेंत नवऱ्याचा दर्जा गुलामाहून अधिक नव्हता, असें मानावयास डांगे तयार आहेत काय ?

रा. डांगे यांनीं आपल्या इतिहासाची उभारणी यज्ञावर केली आहे. परंतु यज्ञ मुळांत एका गते-तिहासाचें प्रतीक आहे. ह्या यज्ञरूपी प्रतिमेंत अथवा आरशांत आपणांस एक पूर्व घटना अंशतः पाहावयास मिळते, हा विचार त्यांस सुचला नाहीं. यज्ञ ही एक स्वतंत्र संस्था आहे असें ते गृहीत धरून चालले, असें वाटतें.

विस्तवाच्या शोधामुळें मानवाच्या प्रगतीला प्रारंभ झाला. त्या वेळीं—म्हणजे मानवाचा अवतार झाल्यानंतरच्या काळांत—सर्व जमीन घनदाट वृक्षांनीं आच्छादिलेली होती. वृक्ष आणि मनुष्य यांचें नैसर्गिक शत्रुत्व आहे. पशु-पक्ष्यांना जंगल पाहिजे. मनुष्याला ऐसपैस मोकळी--उघडी जागा पाहिजे. झाडें खाक झाल्याविना प्रगतीचें पाऊल टाकतां येत नाहीं. परंतु हीं झाडें नष्ट कशीं करणार ? धातूचीं कुऱ्हाडीसारखीं हत्यारें नव्हतीं. अग्नि निर्माण करण्याची कला हस्तगत होतांच विस्तवानें झाडें जाळतां आलीं; धान्योत्पादनाला व वस्ती करावयाला भूमि मिळाली; माणसें हर्षानें नाचूं बागडूं लागलीं. डांगे म्हणतात त्याप्रमाणें, जंगल कमी होतांच जंगलांतील पशु माणसाळवण्याची क्रिया सुरू झाली. आजच्या कोट्यधीशांना जितकी पैशाची किंमत वाटते तितकी गाई-बैलांची तत्कालीन लोकांना वाटूं लागली. हें सर्व लोकांना अग्नीनें मिळवून दिलें. ह्याच हेतूनें ऋग्वेदांत अग्नी-पाशीं 'मला विपुल धन दे' म्हणून प्रत्येक मंत्र-कर्ता याचना करीत असलेला आढळतो. 'तूं वृक्षांना जाळून खाक करितोस' अशा स्पष्ट शब्दांत अग्नीचें वर्णन केलेलें आढळतें, हेंहि त्यामुळेंच. ध्यानांत ठेवावयाचें हें कीं, वेदींतील अग्नि वृक्ष जाळणारा नव्हता. वेदींतील अग्नीला वरील वर्णन साजेसें नाहीं. ह्याच कारणानें, मूळ घटनेचें स्मारक म्हणून यज्ञसंस्था प्राचीन ऋषींनीं कृतज्ञताबुद्धीनें बनविली असें मानणें भाग आहे. यज्ञांत दर्भासन पवित्र मानलें जातें. ह्याचें कारण पूर्वीं जमिनीवर बसावयाचें झालें तर गवतावर बसल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. हे सर्व विधी चिह्नरूप 'सिंबॉलिक' अथवा प्रतीकात्मक आहेत. स्वतंत्र घटना ह्या दृष्टीनें यज्ञसंस्थेचा विचार केल्यास तो भ्रामक होईल. लुप्त झालेल्या इतिहासाचें सार ज्यांत आहे तो यज्ञ. ह्या दृष्टीनें यज्ञसंस्थेचा अभ्यास केल्यास तो उपयुक्त ठरेल. अश्वमेध-यज्ञांत यजमान, पत्नी व गतप्राण अश्व ह्यांच्या संभोगाची जी बतावणी केली जाते तिच्यावरून यज्ञ ही एका मूळच्या अस्सल प्रतीची विकृत अगर बेगडी नक्कल आहे ह्याविषयीं शंका राहात नाहीं.

ह्याच यज्ञांत ऋत्विज् व दासी ह्यांच्यांत होत असलेल्या अत्यंत बीभत्स संवादाचा उल्लेख डांगे यांनीं आपल्या प्रबंधांत केला आहे. त्यावरून इतकेंच अनुमान निघतें कीं, त्या काळीं लैंगिक व्यवहाराविषयीं लोकांच्या मनांत किळस उत्पन्न होत नसे. लज्जेची भावना निर्माण झाली नव्हती. ह्या स्थितीचें स्मरण करून देणारा शिमगा आजहि चालूं आहेच. सांप्रत होत असलेलें इतिहासलेखन दूषित आहे ही डांग्यांची तक्रार यथायोग्य आहे. प्रांताभिमान, देशाभिमान, जात्यभिमान ह्या अभि-मानत्रयीच्या जोडीला इतिहासलेखनविद्येचें अज्ञान व प्रचलित समजुतींपुढें मान तुकविण्या-इतका भ्याडपणा इत्यादि दोषांनीं महाराष्ट्रांतील इतिहास विकृत स्वरूपांत लोकांपुढें ठेवून लोकांची दिशाभूल करण्यांत येत आहे. इतिहासांत 'ऐतिह्य'-पेक्षां 'ऐतिहासिक' अधिक प्रकट होऊं लागला कीं इतिहासाचा खेळखंडोबा होतो. परंतु चमत्कार हा कीं, पाठीमागच्यांना ठपका लावतांना डांग्यांनीं त्यांनाहि मागें टाकलें ! मार्क्साभिमान नांवाचा एक नवीन दोष मार्क्सवाद्यांनीं निर्माण केला आहे. स्वतः मार्क्सला जें दिसलें नसतें तें आमच्या येथील मार्क्साभिमान्यांना दिसतें. जें प्रतिपादन करण्याला प्रत्यक्ष मार्क्स धजला नसता तें बे-लगामी प्रतिपादन येथील त्यांच्या शिष्यांकडून







निधड्या छातीनें करण्यांत येतें. भारतांत भांडवलशाहीचा उदयहि झाला नव्हता, अशा वेळीं त्यांना भांडवलशाही धिंगाणा घालीत असलेली दिसते. सरंजामशाही व भांडवलशाही एकाच वेळीं पिंगा घालीत असतात, असें मार्क्सवाद्यांचें म्हणणें आहे काय ? हीं दोन्हीं एकाच परंपरेंतील व एकाच कार्यकारणभावानें जन्मास आलेलीं भावंडें आहेत, असें ह्यांचें प्रतिपादन आहे कीं काय, समजत नाहीं ! नुसत्या श्रीमंतीला, धनसंचयाला हे भांडवलशाही समजतात अशी शंका येते. धनाचा उपयोग उद्योगधंदे काढण्यांत होतो, तेव्हांच त्याला भांडवल हा शब्द वापरणें युक्त होईल. द्रव्य सांठवून चैनींत ऐषआरामांत राहाण्याकडे त्याचा उपयोग झाल्यास तें भांडवल होणार नाहीं. द्रव्याच्या बलावर एकादा जमीनदार बनला तरी तो भांडवलदार होणार नाहीं. पैसा थोड्यांच्या हातीं राहिला तर ताबेदारी वाढेल, समाजांत उच्चनीच भाव उत्पन्न होईल हें खरें. तथापि तो परिणाम उद्योगधंद्यांत लावलेल्या भांडवलाच्या परिणामाच्या जातीचा नव्हे. कार्ल मार्क्सनें अर्थशास्त्रांत अत्यंत उपयुक्त भर टाकिली व समाजाच्या स्थित्यंतराचा विचार करणारांना एक अभिनव दृष्टि दिली, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु मार्क्सवाद निरपवाद आहे, संपूर्ण आहे, त्रिकालाबाधित आहे हें त्याच्या अनुयायांचें म्हणणें, केवळ चुकीचें नव्हे तर, अचरटपणाचें आहे. मार्क्सवादांत माणसाच्या कल्पनाशक्तीला विशेष किंमत देण्यांत येत नाहीं. परिस्थिति त्यांच्या मतें अधिक परिणामकारक आहे, हें मत निःसंशय एकांगी आहे. मानवी बुद्धि व परिस्थिति हीं परस्परांना पूरक आहेत. विस्तव पाडण्याची कल्पना मानवाला सुचली व तिच्यामुळेंच सुधारणेचा मार्ग मोकळा झाला. मनुष्य हा कांहीं परिस्थितीच्या हातचें बाहुलें नाहीं. तो परिस्थितीला वळवूं शकतो आणि परिस्थिति त्याच्यावर आपला अंमल चालविते. उत्पादन मनुष्याच्या अकलेवर व त्याच्या विवेकशक्तीवर अवलंबून असणार. संशोधनाला आज केवढें प्रोत्साहन मिळत आहे !

एकंदरींत डांग्यांच्या पुस्तकावर चांगला अभिप्राय देणें कठिण आहे. शूद्र म्हणजे दास हा अपूर्व शोध लावणाऱ्या डांग्यांना काय उत्तर देणार ! डॉ. आंबेडकरांच्या मतें क्षत्रियांना ब्राह्मणांनीं शूद्र बनवलें. आतां डांगे म्हणतात, शूद्रांना गुलाम केलें ! दोघांचें म्हणणें एकत्र केलें तर क्षत्रियांना ब्राह्मणांनीं गुलाम केलें असें होतें ! ह्याचें नांव इतिहास ! असे अनेक मासले आहेत. सर्वांना उत्तर देणें शक्य नाहीं. एकाच विषयाचा उल्लेख करून आटोपतें घेणें बरें. तो विषय म्हणजे गणराज्यें. ह्या गणराज्यांची प्रशंसा डांग्यांनीं व इतरांनींहि पुष्कळ केली आहे. आमच्या मतें जातपंचायतीपेक्षां हीं वैराज्यें ( ? ) फारशीं निराळीं नसावींत. निरनिराळे संघ, त्यांचा राजा, त्यांच्या सभा, त्यांच्या निवडणुकी हे सर्व प्रकार आजच्या पंचायतींत आढळतात. जातीच्या प्रमुखाला राजा न म्हणतां नाईक म्हणतात. ही कारभारी सत्ता लोकविषयक होती; स्थलविषयक नव्हती. ह्या कारणानें आमच्याकडे स्वामिभक्ति हा गुण वाढीस लागला. देशाभिमान निर्माण झाला नाहीं. डांग्यांना हा स्थलाभिमान वावडा आहे. परंतु स्वराज्यप्राप्तीनंतरसुद्धां आम्हांला अडचणी भेवडावीत आहेत. ह्याचें कारण देशाभिमानाचा अभाव आणि जात्यभिमानाचा अतिरेक हें होय. असो.

एकंदरींत, हिंदुस्थानांतील कम्युनिस्टांनीं मार्क्सवादाचें येथें विडंबन चालविलें आहे असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. अखेरीस ते आमच्या वळणावर गेले. शब्दप्रामाण्य व विभूतिपूजा हे आमचे राष्ट्रीय दुर्गुण आहेत. त्यांच्या भोंवऱ्यांत कम्युनिस्ट सांपडले व सनातनी बनले. आपल्या बुद्धीला त्यांनीं तिलांजलि दिली !



अनुक्रमणिका








# २. दिशाभूल करणारी संशोधनक्षेत्रांतील साहसी कृति

श्री. दि. के. बेडेकर

वेदसंहितेच्या काळापासून महाभारतीय युद्धापर्यंतचा काळ म्हणजे भारतीय आर्यांच्या प्राचीनतम इतिहासाचा काळ आहे व त्या काळांत बर्बरावस्थेंतील समूहजीवनापासून गुलामगिरीवर आधारलेल्या समाजव्यवस्थेपर्यंत भारतीय समाजाचीं स्थित्यंतरें होत गेलीं आहेत, असा सिद्धान्त कॉ. डांगे यांनीं आपल्या ग्रंथांत मांडला आहे. ‘ भारता ’चा इतिहास त्यांना मांडावयाचा आहे ही गोष्ट त्यांच्या ग्रंथाच्या नांवांतच त्यांनीं ठळकपणें मांडली आहे. केवळ आर्यसंज्ञक जातीचा प्राचीन इतिहास त्यांना अभिप्रेत नाहीं, हें ग्रंथाच्या नांवावरून तर दिसतेंच. शिवाय, त्यांचें असेंहि मत आहे कीं, “ वर्णव्यवस्था, खासगी मालमत्तेची पद्धति व शूद्र-गुलामगिरी यांचीं प्रौढ व स्थिर स्वरूपें, भारतांत आल्यानंतर दीर्घ कालांतरानें, आर्यगणांनीं निर्माण केलीं, असें पुष्कळशा खात्रीलायक तऱ्हेनें म्हणतां येतें ” ( पान १३७ पाहा ). ग्रंथांतील अनेक ठिकाणच्या उल्लेखांवरूनहि हीच गोष्ट जास्त स्पष्ट होईल कीं, भारताच्या भूमीवर आर्यांनीं घडविलेल्या इतिहासाचें आणि समाजव्यवस्थेचें विश्लेषणच कॉ. डांगे यांना अभिप्रेत आहे.

भारत ही भूमि आणि आर्य हेच त्या भूमीवरील इतिहासाचे एकमेव निर्माते, एवढ्या विषयमर्यादा स्वतःला घालून घेऊन कॉ. डांगे यांनीं संशोधनाला प्रारंभ केला आहे. या संशोधनाला व सिद्धान्त-रचनेला लागणाऱ्या वास्तवांतील प्रत्यक्ष पुराव्याची सामग्री कॉ. डांगे यांनीं वेदब्राह्मणादि वाङ्मयांतून आणि रामायण-महाभारतादि महाकाव्यांतून निवडली आहे.

त्यांच्या संशोधनाचा साराच भर व भार केवळ या वाङ्मयावर आहे आणि मुख्यतः यज्ञसंस्थेच्या व गोत्रव्यवस्थेच्या आधारानें त्यांनीं आपले सिद्धान्त मांडले आहेत. भारतीय आर्यांचा मुख्य ग्रंथ जो वेद त्याचें प्रयोजनच यज्ञासाठीं आहे आणि यज्ञांमध्यें आर्यांच्या समाज-अवस्थांच्या विकासाचें प्रतिबिंब उमटत गेलेलें आहे, अशा मूलभूत प्रमेयांवरच त्यांच्या सर्व सिद्धान्ताची इमारत आहे ( पान २९ पाहा ). यज्ञाइतकेंच महत्त्व त्यांनीं गणगोत्रांना दिलें आहे. आर्यजन प्राचीनतम कालीं ज्या बर्बरसमूहांत राहत होते त्या बर्बरसमूहांनाच गणगोत्रांचें रूप होतें, या प्रमेयाला त्यांच्या मीमांसेंत फार महत्त्व आहे.

कॉ. डांगे यांनीं आपल्या सर्व ग्रंथाला आधारभूत धरलेलीं हींच यज्ञविषयक आणि गोत्रविषयक प्रमेयें एक जुने पंडित श्री. कुंटे यांनीं अशींच मांडलीं आहेत. श्री. कुंटे ह्यांनीं ‘ व्हिसिसिट्यूड्स् ऑफ आर्यन् सिव्हिलिझेशन ’ या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, ब्रिटिश लोकांचा सामाजिक इतिहास समजून घेण्यासाठीं मॅग्ना चार्टापासून अद्यावत् राज्यघटनेपर्यंत सर्वांचा अभ्यास केला पाहिजे, त्याप्रमाणें आर्यांचा इतिहास संशोधण्यासाठीं यज्ञसंस्थेचा अभ्यास केला पाहिजे ( पान २० ). यज्ञसंस्थेच्या विकासाच्या चार अवस्था श्री. कुंटे यांनीं मांडल्या असून त्या अवस्थांचा, ( १ ) बर्बरावस्था ( २ ) गोपालन-अवस्था ( ३ ) कृषिप्रधान अवस्था आणि ( ४ ) राजसत्ताक मध्ययुगीन समाज-अवस्था—या चार सामाजिक स्थित्यंतरांशीं अन्वयहि लावून त्यांनीं दाखविला आहे.[1] या चार सामाजिक स्थित्यंतरांचा सिद्धान्त आपण जॉन स्टुअर्ट मिलच्या ‘ पोलिटिकल एकॉ-

1 “ The system of Aryan sacrifices affords the best criteria for dividing the hymns of the Rik-Samhita into four parts corresponding to the four stages of civilization ” पान १४.








नॉमी ' च्या प्रस्तावनेंतून[२] घेतल्याचें श्री. कुंटे यांनींच, पान ७ वर, नमूद केलें आहे.

यज्ञाप्रमाणेंच गोत्रव्यवस्थेबद्दलहि श्री. कुंटे यांनीं असें म्हटलेलें आहे कीं, 'आर्यांची गोत्र-व्यवस्था त्यांच्या समाजाचे जे एकरक्तानुबंधी (consanguine) समूह होते त्यावर रचलेली आहे ' (पान १२).

आर्यांच्या सामाजिक स्थित्यंतरांचा यज्ञसंस्थेशीं व गोत्रव्यवस्थेशीं असा संपूर्ण अन्वय लावण्याचे श्री. कुंटे यांनीं केलेले हे प्रयत्न सन १८८० मधील आहेत. त्या वेळीं मार्क्सचा याबाबतींतला गुरु जो मॉर्गन त्याचें नांवहि हिंदुस्थानांत ठाऊक नव्हतें, व मार्क्सहि माहीत नव्हता; इतकेंच काय पण एन्गल्सचा प्रमाणभूत ग्रंथ ' फॅमिली, प्रायव्हेट प्रॉपर्टी ॲन्ड स्टेट ' हादेखील श्री. कुंटे यांच्या ग्रंथानंतर, म्हणजे सन १८८४ मध्यें, प्रसिद्ध झाला. तेव्हां असा अन्वय लावण्याचा प्रयत्न करणारे जुने भारतीय पंडित म्हणून श्री. कुंटे यांचा आदर कॉ. डांगे यांनीं ग्रंथारंभींच करावयास नको होता काय? ' यज्ञ ' व ' गोत्र ' या मुख्य कल्पनांच्या बाबतींत कॉ. डांगे यांनीं हें गुरु-ऋण फेडणें, हें त्यांचें कर्तव्य होतें, असें मला वाटतें.

कॉ. डांगे यांनींहि हें गुरु-ऋण फेडलें आहे. पण तें असें कीं, साऱ्या ग्रंथांत त्यांनीं श्री. कुंटे यांचा इतर पंडितांबरोबर तीनदांच ओझरता उल्लेख करून त्यांची ' राष्ट्रीय अभिनिवेशानें भारलेली कोती संशोधन-दृष्टि ' उपहासिली आहे! दोन ठिकाणीं त्यांनीं सोमयागाबद्दलची श्री. कुंटे यांची कल्पना उल्लेखिली आहे (पानें ४८ व ८३ पहा). पण श्री. कुंटे यांनीं सोमयागांत आर्यांच्या भ्रमणांचें प्रतिबिंब ओळखलें, तरी पण यज्ञामध्यें आर्यसमूहांचें सर्वच दैनंदिन समाजजीवन प्रतिबिंबित आहे, हें त्यांना उमगलें नव्हतें, असा शेरा मात्र कॉ. डांगे यांनीं मारून ठेवला आहे (पान ८३), तो साफ चुकीचा आहे, हें श्री. कुंटे यांच्या ग्रंथाविषयीं मी दिलेल्या माहितीवरून दिसून येईलच.

यज्ञसंस्थेचा आर्यसमाजाच्या प्रत्यक्ष स्थित्यंतरांशीं घनिष्ठ जिवंत अन्वय लावण्याचा प्रयत्न सन १८८० मध्येंच करून, आपल्या ५५३ पानांच्या ग्रंथांत तपशीलवार सामग्री जुळवून मांडणारे श्री. कुंटे यांचें गुरु-ऋण न फेडतां, ' त्यांना तो अन्वय कळलाच नव्हता व मी प्रथमच हा अन्वय लावीत आहे ' असें कॉ. डांगे यांनीं प्रतिपादन करणें हें, मला वाटतें, अन्यायाचें आहे. त्या प्रमेयाचें ऋण आदरानें उल्लेखून आपण त्यांत अमुक भर घातली व सुधारणा केली असें सांगणें हेंच त्यांचें संशोधक या नात्यानें कर्तव्य होतें. पण ऋणाची बाब सोडून आपण आतां हें पाहूं कीं, कॉ. डांगे यांनीं भर तरी कोणती घातली?

कॉ. डांगे यांनीं मुख्यतः जी भर घातली आहे ती अशी कीं, मिलच्या चार अवस्थांशीं श्री. कुंटे यांनीं अन्वय लावला त्याऐवजीं एन्गल्सनें मांडलेल्या मानवसमाजाच्या अवस्थांशीं कॉ. डांगे यांनीं तोच संबंध लावून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

पण मिलच्या आराखड्याऐवजीं एन्गल्सचा आराखडा घेतल्यानें तशी फारशी गैरसोय न होतां सरळ जुनीच सामग्री कॉ. डांगे यांना नव्या सांच्यांत रचतां आली आहे. हें कसें आपोआप सहज साधलें आहे, तें स्पष्ट होण्यासाठीं श्री. कुंटे व कॉ. डांगे यांच्या प्रतिपादनाच्या अनुषंगानें तुलना करून पाहण्यासारखें आहे.

आपल्यासमोरील विषयांपुरतीच ही तुलना मीं करीत आहे. मिलनें चौथ्या अवस्थेला ' फ्यूडॅ-लिझम् ' असें चुकीनें म्हटलें आहे, परंतु एन्गल्सनें गुलामगिरीच्या अवस्थेनंतर व तिच्या नाशानंतर युरोपांत उदयास आलेल्या मध्ययुगीन समाजरच-नेला ' फ्यूडॅलिझम् ' म्हटलें आहे. परंतु, या विष-यांत खोल न शिरतां मी एवढेंच दाखवूं इच्छितो कीं, एन्गल्सचा आराखडा घेऊनहि श्री. कुंटे यांच्या प्रतिपादनाहून मूलतः वेगळें असें सांगण्याची गरजच कॉ. डांगे यांना पडलेली

---

२ मिलचा हा ग्रंथ प्रथम सन १८४८ त प्रसिद्ध झाला. सन १८७१ च्या आवृत्तींत या चार अवस्थांचें वर्णन पानें १२ ते २५ वर आहे.








नाहीं. (खालील कोष्टक पहा.[२]) बर्बरसमूहकाळांतील आर्यसमाज बदलत गेला व शेवटीं महाभारतीय युद्धाच्या काळापर्यंत त्या समाजांत वर्णव्यवस्था व शूद्रांचें दास्य उत्पन्न झालें, असेंच श्री. कुंटे यांनीं तपशीलवार मांडलें आहे. त्यांनीं वेदापासून महाकाव्यापर्यंत सर्व वाङ्मयांतून सामग्री गोळा करून हीं स्थित्यंतरें वर्णन केलीं आहेत. अनार्यांना जिंकून त्यांना शूद्रांचें स्थान देण्यांत गुलामांचा वर्गच आर्यांनीं निर्माण केला व त्यामुळें पूर्वींच्या आर्यसंघाचें वर्गविहीन सामूहिक जीवन जाऊन, भारतीय आर्यांचा समाज वर्गनिष्ठ झाला, असें श्री. कुंटे यांनीं स्पष्ट म्हटलें आहे.[४] अशा दासप्रधान आर्यसमाजांतील क्षत्रिय सत्ताधाऱ्यांच्या यादवीनें महाभारतीय युद्धाचा भयंकर संहार शेवटीं घडून आला व त्या संहारामुळें सत्ताधारी दुबळे झाल्यानें दलित वर्गांना डोकें वर काढण्यास पुढें वाव मिळाला, हें विवेचनहि श्री. कुंटे यांनीं केलें आहे (पानें २५१ ते २५५).

या साऱ्याचा सारांश माझ्या मतानें असा निघतो कीं, एन्गल्सच्या आराखड्यांत जुनी सामग्री ढाळणें हें कार्यहि कॉ. डांगे यांच्यासाठीं श्री. कुंटे यांनीं पुष्कळच सोपें करून ठेवलें होतें.

आतां अगदीं वेगळ्याच तऱ्हेनें कॉ. डांगे यांच्या या संशोधनव्यापाराचा परामर्श घेणें जरूर आहे. भारताच्या प्राचीन समाजविकासाचें संशोधन करतांना खरोखर जो मूलभूत प्रश्न उभा राहतो तो असा कीं, कोणाहि संशोधकापुढें संशोधनाची दिशा व सामग्री कोणती हवी ? भारताच्या प्राचीनतम इतिहासाचें संशोधन करावयाचें कोणीही ठरविलें तर किमान कोणत्या गोष्टी त्या संशोधकानें केल्या पाहिजेत ? कोणतीं पथ्यें पाळलीं पाहिजेत ? म्हणजेच जर रोकडा सवालच टाकावयाचा तर, असें संशोधन करावयाचें म्हणजे काय करावयाचें ?

कॉ. डांगे हे नुसते संशोधक नाहींत, तर 'मार्क्स'चे शिष्य आहेत आणि संशोधक आहेत. म्हणून तर, माझ्या मतें, वरील सारे प्रश्न जास्तच रोखठोकपणें त्यांनीं स्वतःला विचारावयास हवे होते !

माझ्या अल्पमतीला मार्क्सवादी संशोधनाचें व विशेषतः मार्क्सच्या वस्तुनिष्ठ इतिहासदर्शनाचें, जर कांहीं आकलन झालें असेल तर तें असें आहे कीं, वस्तुनिष्ठता हें मार्क्सच्या सर्व पद्धतीचें सार आणि मर्म आहे. आराखडे घेऊन त्यांत वस्तूंना कोंबण्याची व जुळविण्याची पद्धति सर्वच खऱ्या संशोधकांना निंद्य वाटते तशी मार्क्सलाहि वाटते. मग तो आराखडा मार्क्सवादाचा का असेना ! ह्या

---

२

| मिलचा आराखडा | एन्गल्सचा आराखडा | |
|---|---|---|
| १. बर्बरावस्था (Barbarism) | १. वर्गविहीन समूह (Primitive Communes) | १. आर्यगणांचें समूहजीवन |
| २. गोपालन–अवस्था (Pastoral Stage) | २. गोपालन–अवस्था (Pastoral Stage) | २. आर्यांचें विजिगीषु भ्रमण |
| ३. कृषिप्रधान अवस्था (Agricultural Stage) | ३. कृषिप्रधान आणि वर्गनिष्ठ अवस्था व गुलामगिरीची अवस्था | ३. शूद्रवर्गाच्या गुलामगिरीवर रचलेल्या ब्राह्मण-क्षत्रियांच्या सत्तेचा काळ. |
| ४. राजसत्ताक व गुलामगिरीवर आधारलेली अवस्था (Feudalism) | | |

4 "They (Shudras) were the slaves of the Aryas... The history of the Shudra-slaves reproduced itself in that of the Negro-slaves.... Thus the Aryan community was stratified."–(pages 202-203, 'Vicissitudes etc.')








वस्तुनिष्ठतेचा अर्थ प्रत्यक्ष संशोधनाच्या व्यवहारांत असाच लावावा लागतो कीं, संशोधनाच्या विषयाला अधांतरीं उचलून कोणत्या तरी कप्प्यांत टाकण्याचा मोह संशोधकाला टाळावा लागतो व त्या विषयाला स्वतःचें असें कांहीं वैशिष्ट्य (व्यक्तित्व म्हटलें तरी चालेल) आहे, हें संशोधकानें क्षणभरहि विसरून चालत नाहीं. पोस्टांतील पत्रांची विभागवार छाननी करणारा सॉर्टर आणि संशोधक यांच्यांत हाच फरक आहे!

म्हणूनच कॉ. डांगे यांच्या साऱ्या ग्रंथावर व त्यांतील प्रपंचावर खरा मूलभूत आक्षेप हाच घ्यावा लागेल कीं, भारतीय आर्यांना त्यांनीं अलगद अधांतरीं उचलून घेतलें आहे व मग एन्गल्सप्रणीत मानवविकासाच्या आराखड्यांत त्यांना सांचेबंद रीतीनें 'जमविलें' आहे; प्राचीन संस्कृतीच्या, आणि विशेषतः प्राचीन भारतीय संस्कृतीच्या शास्त्रांत प्रसिद्ध असलेल्या आणि मार्क्सवादीहि असलेल्या गॉर्डनचाइल्ड-थॉम्पसन प्रभृति कांहीं तज्ज्ञांनीं मिळून कॉ. डांगे यांच्या ग्रंथावर एक परीक्षण लिहिलें आहे त्यांत हाच आक्षेप घेतला आहे[5] कीं, "केवळ वाङ्मयीन पुराव्यांवर भिस्त टाकून राहिल्यामुळें, आर्य या संज्ञेचा आशय केवळ भाषा-कुल-संबंधापुरताच मर्यादित नसून विशिष्ट मूलभूत सांस्कृतिक बाबींमुळें निश्चित होणारे संबंधहि त्या संज्ञेमुळें अभिप्रेत होतात, याचा विचारहि कॉ. डांगे यांना करावासा वाटलेला नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, स्थल-कालांच्या भूमीवरून आर्यांना उचलण्यांत आलें आहे व एक स्वयंभू स्वयंपूर्णता त्यांच्यावर कॉ. डांगे यांनीं लादली आहे. यामुळें अग्नि, कृषि, धातुविज्ञान इत्यादि जे मूलभूत शोध मानवी समाजानें लावले ते सारे आर्यांनीं लावले असा समज कॉ. डांगे यांनीं करून घेतला आहे. प्राचीन मानवशास्त्र व प्राचीन-अवशेष-शास्त्र यांची ते दखल घेत नाहींत. विधि व कथा यांच्यांतले केवळ अंतर्गत पुरावे धुंडाळून त्या विधीच्या व कथेच्या स्वरूपाचा अर्थ लावतात व त्याला ते साकार करूं पाहतात." खरें पाहतां, आर्य-पूर्वज, मूळचे अविभक्त आर्य आणि मग भारतीय आर्य या साऱ्यांच्या कालक्रमासंबंधीं आज भाषा-अवशेष-शास्त्र, प्राचीन-अवशेष-शास्त्रादि क्षेत्रांतील नव्या संशोधनामुळें पूर्वीचीं (लोकमान्यांच्या वेळीं मान्य असलेलीं) अनुमानें टाकावीं लागलीं आहेत. इ. स. पू. ४००० ते ३००० पासून आर्यपूर्वजांचा सुगावा लागतो आणि इ. स. पू. २००० ते १५०० या काळांत आर्यांचा उदय इतिहासांत झालेला दिसतो. ताम्रयुगीन मानवसंस्कृतीच्या परिसरांत व लोहयुगाच्या प्रारंभींच ओळखूं येऊं लागलेल्या लोकसमूहाला 'आर्य' ही संज्ञा लावतां येते व या पार्श्वभूमीपासून आर्यांना तोडणें अशास्त्रीय आहे. बर्बरसमूहावस्थेचा काळ हा इतका प्राचीन आहे कीं, आर्यांच्या इतिहासाचें शेंपूट त्या काळापर्यंत मागेंच न्यावयाचें तर मग वा-नरावस्थेपर्यंत कां नेऊं नये? व एन्गल्सप्रमाणें डार्विनलाहि पाठिंबा देणारे पुरावे वेदवाङ्मयांतून कां गोळा करूं नयेत? एकंदर ताम्रयुगीन व लोहयुगीन मानवसंस्कृतीच्या परिसरांतून आर्यांना अधांतरीं उचलून धरण्याची ही चूक कॉ. डांगे यांनीं मुळांतच केली आहे.

आर्यांना अधांतरीं उचलण्यामुळें, आर्यपूर्वजांपासून फुटून निघण्याच्या काळापासूनच्या आर्यांचा व

---

5 Review by the Indologists' Study Group, in 'Modern Quarterly', (No. 3, 1950, page 278.) The authors say: "Depending entirely on literary sources, he is untroubled by the problem of the original cultural entity underlying the linguistic entity of the Aryans. This leads him to endow the Aryans with a unity removed from time and space, and to credit them with all the basic inventions of human progress—the discovery of the fire, agriculture metallurgy, etc. He neglects the anthropological and archaeological approaches and reconstitutes and interprets a phase of ritual and myth on its own internal evidence."



अनुक्रमणिका






त्यानंतरच्या भारतीय आर्यांचा इतिहास कॉ. डांगे यांनीं डावलला आहे व पन्नास वर्षांपूर्वीचीं आतां खोडलीं गेलेलीं प्रमेयें घेऊन एक भोंगळ कालक्रम, तोहि नांवालाच, आंखला आहे. त्याहिपेक्षां गंभीर प्रमाद असा कीं, भारताच्या प्राचीन इतिहासाचा अर्थ उलगडण्यास सुरुवात करतांना आर्यपूर्व भारताचा —म्हणजे मोहन-जो-दरोच्या प्रौढ, विस्तृत व नागर-संस्कृतीचा व भरतखंडभर पसरलेल्या अनार्य जमातींच्या जीवनाचा, त्यांना पूर्ण विसर पडला आहे.

खरी गोष्ट अशी आहे कीं, मोहन-जो-दरोचा काळ व अशोकाचा काळ या दोन कालस्तंभांना पक्कें धरून मगच आधींचा व नंतरचा भारताचा प्राचीन इतिहास तपासला पाहिजे व त्यांत लोहयुगाच्या प्रारंभकालापासून ( म्हणजे इ. स. पू. २००० ते १५०० ) आर्यांच्या भ्रमणाचा व भारत-प्रवेशाचा विचार केला पाहिजे. ह्या विचारांतहि मूलतः प्राचीन-अवशेष-शास्त्रादि प्रत्यक्ष पुराव्यांचा शास्त्रीय आधार घेतला पाहिजे व विधि-( ritual )-वाङ्मय फक्त पूरक सामग्रीसाठीं, साक्षेपानें व सावधगिरीनें तपासलें पाहिजे.

प्राचीन भारताचा इतिहास वस्तुनिष्ठ रीतीनें तपासावयाचा ठरविला, तरच मग मार्क्सवादी दृष्टीचा फायदा काय तें सप्रमाण दाखविणें शक्य होईल. पण कॉ. डांगे यांची पद्धति व दिशाच वेगळी आहे. अर्थात् तिलाहि परंपरा आहे. वस्तुनिष्ठतेची भूमिका सोडून धाडसी व नेत्रदीपक संशोधन करणाऱ्या किंवा वस्तुनिष्ठेच्या नांवानें व सांचेबंद 'आर्थिक वर्गदृष्टी 'नें साऱ्या घटनांचा 'मार्क्सवादी अर्थ' लावीत बसणाऱ्या भ्रष्ट संशोधकांची निपज खुद्द मार्क्सच्या व एन्गल्सच्या काळांतच झाली होती आणि आपल्या अशा शिष्यवरांकडेच पाहून मार्क्सनें वैतागानें म्हटल्याचें सांगतात कीं 'मी मग मार्क्सिस्ट नाहीं !' त्या शिष्यवरांची परंपरा अखंड चालूच आहे व कॉ. डांगे यांनीं, मला वाटतें, त्याच संप्रदायाची दीक्षा घेतलेली आहे. त्यांच्या ग्रंथांतील सगळ्या अपसिद्धांन्ताचें खंडन करीत बसणें अशा परीक्षणात्मक लेखांत अशक्य व अनावश्यक आहे.

पण एका महत्त्वाच्या बाबतींत त्यांनीं केलेले प्रतिपादन नीट खोडून काढणें मला जरूर वाटतें. ती बाब यज्ञयागादि विधि ( ritual ) आणि जीवनाचें साधें वास्तव ( real )-यांच्या परस्पर-संबंधाची आहे. भारताचा इतिहास सांगतांना त्याचे इतर प्राचीन समाजापासून वेगळेपण किंवा वैशिष्ट्य काय, हें न सांगतां सर्व एकाकारच करण्याची जी अशास्त्रीय वृत्ति कॉ. डांगे दाखवितात तीच विधि व वास्तव यांच्या बाबतींतहि ते दाखवितात.

विधीचें वैशिष्ट्य काय हा खरा प्रश्न आहे. विधीचा वास्तवापासून वेगळेपणा नेमका कशांत आहे, हा त्यांतून निघणारा दुसरा प्रश्न आहे.

विधि म्हणजे काय ? त्याला कॉ. डांगे यांचें उत्तर सोपें आहे : ते म्हणतात, विधि म्हणजे वास्तवाची नक्कल आहे. 'ममी' केलेलें प्रेत ही मनुष्य-देहाची अवशिष्ट व संस्कारित अवस्था आहे, तसा विधि हा वास्तवाच्या देहाचा एक और्ध्वदेहिक आविष्कार आहे असा त्यांचा ठाम सिद्धान्त आहे. म्हणजेच विधि व वास्तव यांना एकाकार, एकच मानण्याची त्यांची भूमिका आहे. श्री. कुंटे यांची मात्र ही भूमिका नाहीं व तिचें श्रेय खास कॉ. डांगे यांनाच दिलें पाहिजे, हें येथें नमूद केलें पाहिजे.

'अमुक एक गोष्ट आतां निव्वळ विधि झाली आहे' असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां कॉ. डांगे यांच्या अर्थानेंच आपण विधि हा शब्द वापरतों हें खरें ! पण हा प्राकृत अर्थ झाला. एकाद्या महत्त्वपूर्ण संस्काराचें निर्जीव थोतांड उरलें आहे या अर्थीं 'विधि' या शब्दाला मराठीनें असें राबविलें आहे. पण तो अर्थ शास्त्रीय विवेचनाचा व एका गंभीर ग्रंथाचा आधार बनविणें हें मात्र थोतांड ठरेल. दुर्दैव असें कीं, कॉ. डांगे यांनीं 'विधि' शब्दावर हा मराठी श्लेष लादला आहे व मग या श्लेषावर यज्ञसंस्थेचें स्वतःचें अजब 'मार्क्सवादी' विश्लेषण रचलें आहे.

खरें पाहतां विधि हें थोतांड नाहीं व वास्तवाची स्मृति, अवशेष व प्रतिबिंबात्मक नक्कलहि नाहीं. ती एक मानवी मनाची निर्मिति आहे, विचारक्रिया आहे. उदाहरणार्थ, स्त्रीपुरुषसमागम ही प्राकृत क्रिया व विवाह हा संस्कार किंवा विधि घ्या. विधीमध्यें मानवी कुटुंबसंस्था, मालमत्तेचा विचार,







प्रगल्भ प्रणय इत्यादि विचारांचा गाभा आहे; नुसती जंतुक्रियेची ती आवृत्ति नाहीं.

या अर्थीच विधि हा वास्तवापासून, म्हणजे प्राकृत जीवनकर्मापासून वेगळा असतो. विधि हा वस्तुतः मानवी विचारच असतो. विचार ही अमूर्त गोष्ट असते असा आपला आधुनिकांचा पक्का ग्रह असतो, पण कांहीं विचारांना आपण मूर्त स्वरूपहि देतों व त्याला कलाकृति म्हणतों ही गोष्ट आपल्याला विसरून चालणार नाहीं. प्राचीनतम काळांतील मानवी मनानें आपल्या बहुतेक विचारांना क्रियात्मक देह दिला व त्यांनाच विधि म्हटलें, ही गोष्टहि आपण ओळखली पाहिजे. तरच प्राचीन मानवाच्या मनाचा व समाजाचा आशय आपल्या आधुनिक मनाला उमगूं शकेल.

विधि व वास्तव यांमधील हाच फरक साधे शब्द व मंत्रशब्द यांतहि आहे. एका शक्तीचा (गारुडाचा) संचार झालेले शब्द म्हणजे मंत्र. मंत्राच्या सामर्थ्याची ही कल्पना जर त्यांतून काढून घेतली तर, मंत्राचें मंत्रत्व राहत नाहीं. कारण मंत्राचा आत्मा त्यांत अभिप्रेत असलेल्या या सामर्थ्याच्या विचारांत आहे. तसेंच विधीमधील वैचारिक आत्माच जर त्यांतून वजा केला तर विधीला अर्थच उरत नाहीं.

म्हणूनच विधि आणि वास्तव यांचा एकाकार करतां कामा नये आणि त्यांचा अन्योन्य-संबंध विचार आणि वास्तव यांच्या अनुबंधासारखा मानला पाहिजे. विस्तृत देशकाल घेतले तर विचार हे शेवटीं वास्तवावरच आधारलेले असतात, पण वास्तवाचें निव्वळ जड प्रतिबिंब म्हणजे विचार नव्हे. मार्क्सनें ज्या जडवस्तुवाद्यांवर कठोर टीका केलेली आढळते, त्यांचें मत मात्र असें होतें कीं, विचार जडाशीं एकरूप व या अर्थी निव्वळ प्रतिबिंबात्मक आहेत. मार्क्सच्या तत्त्वदर्शनांत व इतिहास-दर्शनांत अशा जडवस्तुवादाला व विचार-वास्तवाच्या एकाकाराला वस्तुतः मुळींच वाव नाहीं. दुर्दैव मात्र असें आहे कीं, मार्क्सवादाच्या नांवावर असा जडवस्तुवादच खपविण्याचा गुन्हा पूर्वीहि अनेक भ्रष्ट 'मार्क्सवाद्यां'नीं केला व तोच आज कॉ. डांगे करीत आहेत.

मार्क्सच्या इतिहासदर्शनाचें स्वरूप सांगण्याची ही जागा नव्हे. येथें एवढेंच सांगणें जरूर आहे कीं, यज्ञविधीला तत्पूर्वकालीन प्राकृत दैनंदिन वास्तवाची स्मृतिरूप आवृत्ति मानणें, हें मार्क्सवादाला तर सोडून आहेच, पण साध्या इतिहासमीमांसेलाहि सोडून आहे. यज्ञविधि हें समकालीन समाजांतील विचारांचें क्रियात्मक स्वरूप आहे व त्या समाजांतीलच वास्तवाशीं त्याचा तसा परोक्ष अन्वय आहे, ही गोष्टच पक्की मनांत बाळगून प्राचीन मानवसंस्कृतीचा मागोवा घेत गेलें पाहिजे.

मग यज्ञविधीला कांहीं ऐतिहासिक विकासाचा कालक्रम नाहीं काय? तसा तो आहेच आहे व तो अभ्यासिला पाहिजे. तो तपासतांना अशीहि अपेक्षा करणें योग्य ठरेल कीं, वेदकालीन यज्ञविधींत, वेदपूर्वकालांतील व बर्बरसमूहकालांतीलहि विधींचे अवशेष सांपडतील. विधींना पावित्र्य असल्यामुळें या अवशेषांचा संभव जास्तच आहे. किंबहुना असे अवशेष सांपडतातच. अश्वमेधांतील 'अश्व-महिषी-उपसंवेशनाविधि' हा असाच अवशेष आहे. पण कशाचा? तर एखाद्या प्राकृत समागमाचा नव्हे, तर पुरुषाच्या यज्ञीय समागम-विधीचा आहे. प्राचीनतम अशा पुरुषमेधांतील मेध्य पुरुषाच्या जागीं अश्व हा आल्यामुळें अश्वमेधांतील 'उपसंवेशना'ला बाह्यतः विपरीत रूप आलें आहे, ही गोष्ट सहज दिसणारी नाहीं काय? पण गंमत अशी आहे कीं, कॉ. डांगेच नव्हेत तर इतर कांहीं पंडितहि या बाबतींत विधि आणि वास्तव यांचा एकाकार करून स्वतःची व इतरांची भयंकर दिशाभूल करीत आहेत. प्रा. र. दा. करमरकर यांनीं नुकताच अश्वमेधासंबंधीं लेख लिहून त्यांत असें अजब प्रतिपादन केलें आहे कीं, 'अश्व-महिषी-उपसंवेशना'चा विधि हा बर्बरावस्थेतील स्त्रियांच्या पशुसमागमाच्या वास्तवाचीच विधिरूप आवृत्ति आहे![6] 'यज्ञ' म्हणजे एकंदरींत स्वैर व सामूहिक

6 Annals of the Bhandarkar Research Institute. (Vol. xxx, 1949 p. 344.)







पशुसम समागमाच्या वास्तव प्रसंगाचें चित्र आहे, असाहि निष्कर्ष प्रा. करमरकर यांनीं काढला आहे, व 'यज्ञ' संज्ञेचा धात्वर्थ 'य' व 'ज' या धातूंपासून काढून आपल्या या निष्कर्षाचें भाषाशास्त्रीय समर्थन केलें आहे ! योगायोग असा कीं, कॉ. डांगे यांनींहि हाच निष्कर्ष अशाच व्युत्पत्तीनें सिद्ध केला आहे.

असली व्युत्पत्ति, असले निष्कर्ष व असला 'मार्क्सवाद' कॉ. डांगे यांनीं प्रतिपादन केला किंवा प्रा. र. दा. करमरकरांसारख्या जुन्या पद्धतीच्या पंडितांनीं तसलेच निष्कर्ष काढून प्राचीन यज्ञविधीचें व समाजव्यवस्थेचें विराट् विडंबन केलें तरी, सुदैव असें आहे कीं, समाजशास्त्र, प्राचीन-मानवशास्त्र, प्राचीन-अवशेषशास्त्र व मार्क्सवाद हीं आज इतकीं प्रौढ झालीं आहेत कीं, अशा भ्रष्ट संशोधनानें तज्ज्ञांची व खऱ्या जिज्ञासूंची दिशाभूल होण्यासारखी परिस्थिति राहिलेली नाहीं.

शेवटीं समारोपापूर्वी मी एका नव्या मुद्द्याला स्पर्श करतों. प्राचीन भारतीय समाजाचें विश्लेषण मार्क्सवादी दृष्टीनें करणें, हें नुसतें अवघडच नव्हे तर राजमार्ग नसलेल्या प्रदेशांत नवीच पाऊलवाट काढण्याइतकें दुर्घट आहे. साहजिकच, हा प्रयत्न करीत असतांना कॉ. डांगे यांच्या प्रतिपादनांत मोठेहि दोष राहिले असले तरी ते क्षम्य असून त्यांच्या धैर्याचें कौतुक करावयास हवें, असा अभिप्राय त्यांच्या ग्रंथाबाबत शक्य नाहीं काय, असाहि मुद्दा निघणें शक्य आहे. किंबहुना अशी कौतुकाची व सढळ गौरवाची भूमिका डायकॉव्ह या रशियन पंडितानें घेतलेली मला आढळली. भारताचा इतिहास वैशिष्ट्यपूर्ण आहे अशा 'गांधी-प्रणीत' अपसिद्धान्तांचें खंडन करण्याचें कार्य कॉ. डांगे यांनीं मोठ्या कौशल्यानें व पांडित्यपूर्ण तऱ्हेनें पार पाडलें आहे, अशी ग्वाही डायकॉव्ह यांनीं दिली आहे.[७] हा अभिप्राय वाचून मला आश्चर्य तर वाटलेंच पण खेदहि वाटला !

या घटनेचा अर्थ काय ? कॉ. डांगे यांच्या ग्रंथावर इतका आंधळा अभिप्राय डायकॉव्हनीं द्यावा हें कशाचें द्योतक आहे ? माझ्या मतें या घटनेवरून असें दिसतें कीं, प्राचीन भारतीय इतिहासाबद्दल व पर्यायानें सर्व प्राचीन मानवेतिहासाबद्दल व विधींच्या मूलस्वरूपाबद्दल या रशियन मार्क्सवाद्यांच्या विचारांत स्पष्टता नाहीं. भारताचा प्राचीनच काय पण अद्ययावत् कालापर्यंतचा व पुढचाहि इतिहास वैशिष्ट्यपूर्णच असणार हें साधें तत्त्वहि डायकॉव्हनें धिकारावें याचा दुसरा अर्थ लागत नाहीं.

वर एके ठिकाणीं गॉर्डनचाईल्डप्रभृति ब्रिटिश मार्क्सवाद्यांचा अभिप्राय मीं उद्धृत केला आहेच. त्यांनीं मात्र डायकॉव्हची चूकीची भूमिका घेतलेली नसून, उलट "भारतीय समाजाच्या वैशिष्ट्याचा, विचार कॉ. डांगे यांनीं केलेला नसून ढोबळ मानवेतिहासाच्या चौकटींत भारतेतिहासाला बसविण्याचा प्रयत्न केला आहे" असा स्पष्ट आक्षेप घेतला आहे. कॉ. पामी दत्त या प्रसिद्ध मार्क्सवाद्यानेंहि हाच आक्षेप कॉ. डांगे यांच्या ग्रंथाचें परीक्षण करतांना घेतला आहे.[८] यावरून मात्र असें दिसतें कीं, ब्रिटिश मार्क्सवाद्यांनीं डायकॉव्हची चूक भूमिका न घेतां डोळसपणा राखून कॉ. डांगे यांच्या ग्रंथाचें मोजमाप केलें आहे. हाच डोळसपणा राखून प्रा. कोसंबी या मार्क्सवादी संस्कृतज्ञानेंहि कॉ. डांगे यांच्या एकंदर रचनेवर कठोर उपहासपूर्वक टीका केली आहे. [भांडारकर प्राच्यविद्यामंदिराचें वार्षिक ( Annals ) सन १९४८, भाग २९.]

खरी गोष्ट हीच आहे कीं, शूद्रांच्या दास्याला गुलामगिरीची प्रथा समजून चालण्यासारखे श्री. कुंटे यांचे व आतां कॉ. डांगे यांचे प्रमाद टाळावयाचे असतील तर सर्वच संशोधकांनीं, व विशेषतः मार्क्सवाद्यांनीं, कॉ. डांगे यांनीं दाखविलेल्या नव्या पाऊलवाटेचें कौतुक न करतां त्यांचें मार्ग

७ 'कम्युनिस्ट' या भारतीय कम्यूनिस्ट पक्षाच्या इंग्रजी मासिकाच्या ऑक्टोबर-नोव्हेंबर १९५० च्या जोडअंकांत हा लेख प्रसिद्ध झाला आहे.

८ 'लेबर मंथली' ( जानेवारी १९५०; पान ४३.)








दर्शन साफ टाकलें पाहिजे. शिवराज्याच्या राज्य-संस्थापनेला शेतकरी-क्रांति[१] समजण्याच्या ' मार्ग-दर्शना 'प्रमाणेंच ही दिशाभूलहि महाराष्ट्रीय व भारतीय मार्क्सवाद्यांनीं कटाक्षानें टाळली पाहिजे. भारताच्या प्राचीन इतिहासांत मोहन-जो-दारोच्या संस्कृतिमुळें व नंतरच्या घडामोडीमुळें जी वैशिष्ट्य-पूर्ण वर्णव्यवस्था, विशिष्ट ग्रामसंस्था, वतनदारी व राजसत्ता निर्माण झाली, तिचा परिश्रमपूर्वक व नम्र जिज्ञासु वृत्तीनें अभ्यास करण्याचें कर्तव्य आज भारतीय मार्क्सवाद्यांच्यापुढें आहे. तें पार पाडण्या-साठीं कॉ. डांगे यांनीं घातलेला पायंडा म्हणजे एक टाळावयाचा व धोक्याचा मार्ग आहे एवढेंच सांगणें, हें प्रस्तुत परीक्षणाच्या मर्यादेंत मला शक्य आहे.

शेवटीं मला हें मांडणें आवश्यक वाटतें कीं, संशोधनाच्या क्षेत्रांत कॉ. डांगे यांनीं ग्रंथरूपानें एक भ्रष्ट, साहसी व दिशाभूल करणारी कृति निर्माण केली आहे. शिवकालाविषयींचें संशोधन, प्राचीन भारताचें संशोधन, साहित्याचें मूल्यमापन, गांधीवादाचें व राष्ट्रवादाचें आकलन, आंतरराष्ट्रीय बंधुत्वाचें आकलन या व अशा सर्वच क्षेत्रांत या अधांतरी, सांचेबंद व साहसी प्रवृत्ती टाळणें जरूर आहे व त्या दृष्टीनें आपल्या सर्व कार्याचें सिंहाव-लोकन आपण केलें पाहिजे. केवळ प्राचीन भार-तीय संशोधनाच्या दृष्टीनेंच नव्हे, तर भारतांतील मार्क्सवादाच्या व संशोधनाच्या भवितव्याच्या दृष्टीनें व भारतीय मार्क्सवाद्यांना अंतर्मुख करण्याच्या दृष्टीनें, ही गोष्ट स्पष्टपणें नमूद करणें मला जरूर वाटतें.

---

१ ' क्रांति ', १७ फेब्रुवारी १९३८ च्या अंकांतील लेख पाहा. याच अनुरोधानें श्री. लालजी पेंडसे यांनीं लिहिलेली ' धर्म की क्रांति ' ही पुस्तिका मराठी वाचकांना परिचित आहे.

---

# पृथ्वी

विश्वाच्या वेलीवर विकसे
अर्धोन्मीलित अवनी—कलिका
दिशादिशांच्या फुलति पाकळ्या
ज्यावर खुलती रंगमालिका.
हिमकण घेउनि डोकावति वर
हिमालयाचे परागकेसर;
या कलिकेचा मधुर मनोहर
संन्तांचें जीवन हा परिमल

अवकाशाच्या अथांग सागरिं
ग्रहमालांच्या फेनिल लहरी
अगणित फिरती बुद्बुद भिरभिर
असेल पृथ्वी एकच त्यांतिल.

कविता रचिली एक सानशी
मनोरंजनास्तव परमेशें
तीच घुमे ही विश्वमानसीं
केन्द्रांपासुनि अवनी-वेषें !
थबथबलेली सर्व रसांनीं
शान्ति—क्रान्तिच्या जलवहीनीं;
कधीं प्रगट हो, कधीं लुप्त हो
हिच्यांत मानवता रसराणी.

—वसन्त हेबळे








आंद्रे मोर्वाच्या कादंबरीचा परिचय : प्रा. य. का. सोहनी

# ' विचारलेखक यंत्र '

सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक आंद्रे मोर्वा ( Andre Maurois : जन्म इ. स. १८८५ ) याची नव्यानें ओळख करून देण्याचें कारण नाहीं. त्यानें लिहिलेलीं शेले, बायरन, डिझरेली व सातवा एडवर्ड यांचीं चरित्रें प्रसिद्ध आहेत. चरित्रात्मक वाङ्मयाखेरीज त्यानें टीका, निबंध व लघुकथा लिहिल्या आहेत.

इंग्रज व फ्रेंच या शेजाऱ्यांना परस्परांची पूर्ण ओळख करून द्यावी असा त्याच्या बऱ्याच लिखाणाचा उद्देश दिसतो. इंग्रजी स्वभावाचें जवळून निरीक्षण करण्याची प्रथम संधि त्याला पहिल्या महायुद्धाच्या वेळीं मिळाली. त्या सुमारास त्याचें वास्तव्य इंग्लंडमध्यें होतें. याच युद्धांत ब्रिटिश फौजेमध्यें त्यानें दुभाष्याचें काम केलें.

यानंतर त्यानें आपली नजर अमेरिकेकडे वळविली. अमेरिकन लोकांचा दृष्टिकोन समजून घ्यावा, त्यांच्या शिक्षणसंस्था पहाव्यात या हेतूनें त्यानें अमेरिकेची सफर केली. तेथिल मुक्कामांत आलेले अनुभव, विश्वविद्यालयीन जीवन व शिक्षणपद्धति, यांचें प्रतिबिंब त्याच्या ' विचार-लेखक यंत्र '–' La machine a lire les Pensees ' यापुस्तकांत पहावयास सांपडतें. परंतु पुस्तकांतील वरील भाग गौण असून मोर्वाचा सर्व रोख फ्रॉइडच्या तत्त्वज्ञानांतील एका विशिष्ट उपांगा-वर आहे व प्रस्तुत लेखांत त्याच भागाचा परिचय करून द्यावयाचें योजिलें आहे. पुष्कळ वेळां आपल्या मनांत असें येतें कीं, " ' अ ' सारखें आपण श्रीमंत असतों तर ! ' ब ' ची बुद्धिमत्ता आपणांत असती तर ! ' क ' ची सुंदर बायको आपली पत्नी असती तर ! ". एक ना दोन ! असे हजारों विचार आपल्या डोक्यांत काहूर माजवितात. घटकाभर जरी आपली करमणूक होते व भोंवताल-च्या कटु परिस्थितीचा क्षणैक विसर पाडून कल्पनेच्या नितांत रम्य सृष्टींत आपण मनसोक्त विहार करूं शकतों तरी आपण त्यांना फाजील महत्त्व देऊन त्यांच्या आहारीं जाऊं नये हेंच मोर्वाला बजवावयाचें आहे.

असले बंडखोर विचार, मनांत खोल दडून बसलेल्या आशा-आकांक्षा, मनुष्य दुसऱ्याला सांगण्यास तयार नसतो. ही त्याची खाजगी मालमत्ता असते. हिचा यत्किंचितहि वांटा तो दुसऱ्याला देण्यास तयार नसतो. हावभावांवरून अगर चर्येवरून त्याच्या मनाचा ठाव दुसऱ्याला चुकून जरी लागला तरी तो चिडून जातो; आपलें हृदयच कोणी हिरावून नेत आहे, असें त्याला वाटतें !

याउलट, इतरांचे मनोव्यापार जाणून घेण्यास तो फार उत्सुक असतो. वरिष्ठांचें आपणांविषयीं मत, मित्रांचा आपणांवर भरंवसा आहे का, बायकोचें आपणांवर निस्सीम प्रेम आहे, कीं तिच्या मानसमंदिरांत कोणी दुसराच प्रियकर वसत आहे, इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें शोधण्याची तीव्र उत्कंठा त्याला असते. परंतु ही उत्कंठा अल्पकाळ टिकणारी आहे. दुसऱ्याच्या मनाचे सर्व कप्पे, चोरकप्पे उघडून दाखविणारें एखादें साधन उपलब्ध झालें तर सकृत्–दर्शनीं आपणांस असें वाटेल कीं, परस्परांचा दृष्टिकोन कळून आल्यावर







एकमेकांतले हेवेदावे व तंटेबखेडे थांबतील, राजकीय पक्षांतील निष्फळ स्पर्धा बंद पडेल, मालक—मजूर वाद थंडावतील, वैवाहिक जीवन आनंदी होईल ! परंतु हा आपला निव्वळ भ्रम आहे, हें मोर्वानें 'विचार-लेखक यंत्र' या पुस्तकांत कथानकाच्या रूपानें दाखवून दिलें आहे. तें कथानक असें:

एका अमेरिकन विद्यापीठांत हिके या नांवाचा एक इंग्रज शास्त्रज्ञ होता. ध्वनि हा त्याच्या आवडीचा विषय. त्यावर प्रयोग करतांना त्याला असें आढळून आलें कीं, माणसाच्या मनांत ज्यावेळीं कांहीं विचार येतात त्या वेळीं त्याच्या सर्वांगाला एक प्रकारचा सूक्ष्म कंप सुटतो. हा कंप म्हणजेच विचारांबरहुकूम उमटणाऱ्या ध्वनिलहरी होत. या लहरींची नोंद एका तबकडीवर करणारें यंत्र त्यानें शोधून काढलें. ही तबकडी ध्वनिलेखक यंत्रावर ठेवल्यानंतर कोणाहि व्यक्तीचे नोंद झालेले विचार कर्णीतून स्पष्ट ऐकूं येऊं लागले. परंतु दुसऱ्याचें मनोगत केवळ समजून घेण्यापेक्षां त्यायोगें जर व्यक्तीव्यक्तींत दिलजमाई घडवून आणतां आली तर मानवजातीवर फार उपकार होतील अशी ईर्षा बाळगून त्यानें पहिल्या प्रथम एका परिचित जोडप्यावर यंत्राचा प्रयोग करून पहाण्याचें ठरविलें.

सुदैवानं त्याला अशी संधि लवकरच प्राप्त झाली. त्याच्या विद्यापीठाच्या आवारांत दुमुलें हें फ्रेंच जोडपें राहावयास आलें.

दनी दुमुलें हा फ्रेंच भाषेचा एक नामांकित प्राध्यापक होता. तो चतुर लेखक व मार्मिक टीकाकार होता; परंतु स्वभावानें भोळा व व्यवहारशून्य. या उलट त्याची पत्नी सुझान ही घरकामांत तरबेज, किंचित् चिडखोर, शिक्षणानें अगदीं कमी, परंतु अत्यंत व्यवहारदक्ष होती.

दोघांच्या मनाची ठेवण वेगळी असल्यामुळें त्यांचे अधुनमधून खटके होत. पण तितक्याच लवकर त्या दोघांचा समेट होई.

प्रयोग करण्यास हें जोडपें योग्य आहे असें पाहून हिकेनें त्यांचा परिचय करून घेतला. थोड्या अवधींत परिचयाचें रूपांतर दाट मैत्रींत झालें. रविवारीं संध्याकाळीं दुमुलें हिकेकडे गप्पा मारण्यास जाऊं लागला.

एका रविवारीं तो असाच हिकेकडे बसला असतां हिकेनें त्याला अकस्मात् प्रश्न केला :

"काय दुमुलें ! अलीकडे तुम्ही जीवाला कंटाळलेसे दिसतां ?"

"कोण, मी ?"

"हो तुम्ही. गेल्या रविवारीं तुम्ही असेच माझ्याकडे बसलां होतां, तेव्हां जिव देण्याचे विचार तुमच्या मनांत घोळत नव्हते ?"

दुमुलेंला तो रविवार आठवला. सकाळीं त्याचें सुझानशीं कडाक्याचें भांडण झालें होतें. आणि वैतागाच्या भरांत जिवाचं बरं-वाईट करून घेण्याचं त्याच्या डोक्यांत आलं होतं खरं. पण तें क्षणभरच. अंगावर बसलेली माशी झिडकारावी त्याप्रमाणें त्यानें तो नादान विचार मनांतून काढून टाकला होता.

"काय, खरं ना ?" विचारमग्न दुमुलेंकडे पाहून हिके उद्गारला.

"हो, पण तुम्हांला हें कसं समजलं ?"

आपल्या मनाचा कमकुवतपणा हिकेला कळला हें पाहून दुमुलें वरमला. आणि आपलं अंतरंग चोरल्याबद्दल तो हिकेवर रागावलासुद्धां.

"रागावूं नका" त्याचा आरक्त चेहरा पाहून हिके म्हणाला, "मी तुमचे विचार चोरले हें कबूल व त्याबद्दल मला क्षमा करा. परंतु केवळ शास्त्रज्ञ या नात्यानेंच मीं तसं केलं."

अशी प्रस्तावना करीत त्यानें दुमुलेंला आपल्या अजब शोधाची इत्थंभूत हकीकत निवेदन केली.

विचार-चौर्याबद्दल हिकेवर रुष्ट व्हावें, कीं त्याच्या विलक्षण यंत्राचं कौतुक करावं, हें दुमुलेंला कांहीं वेळ कळेना.

'सुझानशीं आपले वारंवार खटके होतात. पाहूं तरी तिच्या मनांत काय आहे?' असा बेत योजून त्यानें निघतेवेळीं हिकेजवळून तें यंत्र एक दिवसाकरतां मागून घेतलं. हिकेला हेंच हवं होतं.

रात्रीं दुमुलेंनें तें यंत्र गुपचुप रीत्या सुझानच्या आरामखुर्चीखालीं ठेवून दिलं व आपण समोरच्या



अनुक्रमणिका






खुर्चीवर वाचीत पडला. नेहमींप्रमाणें सुझान आपलं विणकाम घेऊन बसली. " आज बोलायचं नाहीं का ? " असं मधूनमधून विचारणारा दनी आज बायकोच्या विचारमग्न चेहऱ्याकडे पाहून समाधानाचे सुस्कारे टाकीत होता. तो सुझानकडे चोरून पहात होता. खुर्चीखालचें यंत्र आपली कामगिरी आवाज न करतां बजावीत होतें. उजाडतंय कधीं अन् तबकडी ऐकतोय केव्हां, असं दनीला झालं !

सकाळ झाली. घरच्या ध्वनियंत्रावर तबकडी वाजवून पहाणं इष्ट नाहीं हें ओळखून तो हिकेकडे गेला.

हिकेच्या एका खोलींत एकांतांत बसून तो रेकॉर्ड ऐकूं लागला :

" हूं ! दनी अगदींच भोळा. नाहीं तर त्यानं चुलत्याकडून मिळणारं घर कशाला गमावलं असतं ! काय करायची आहे त्याची विद्वत्ता ! उंची कपडे करायला पैसे नाहींत, हौसेमौजेचं कांहीं करतां येत नाहीं, सदान्‌कदाची काटकसर ! संसारासाठीं पुरेसा पैसा मिळवितां येत नाहीं तर हे प्राध्यापक लग्न तरी कशाला करतात ! हो ! पण, आपल्या गोड भाषणानें व काव्यमय शब्दांनीं आमच्यासारख्या भावड्या मुलींना भुरळ घालतात ना ! तें कांहीं नाहीं. विवाह न करण्याची यांच्यावर कायद्यानं बंदी घातली पाहिजे.—नाहीं तर तो आद्रिअँ पाहा ! कसा चैनींत राहातोय् ! मोटारींतून हिंडतोय् ! खरं म्हटलं तर मला त्याच्याशींच लग्न व्हायचं. माझा तो बालपणचा मित्र. पण आमचे जन्मदाते आडवे आले ना ! किती देखणा अन् गुणी आद्रिअँ ! लग्नाआधीं आम्ही किती हिंडलों ! किती मजा केली ! एकदां तर त्या कमिटीच्या बागेंत आम्ही एका बांकावर अगदीं एकमेकांना बिलगून बसलों होतों ! अन् त्यानं आपल्या हातानं माझी हनुवटी उचलून ...छे ! पण नको ती आठवण...... "

पुढले शब्द ऐकणं दनीला अशक्य झालं. तो ताडकन् उठला व रेकॉर्ड खाकोटीला मारून हिकेला ' येतों ' म्हणूनसुद्धा न सांगतां सरळ घरीं आला.

सुझान नेहमींप्रमाणें स्वयंपाकांत गर्क होती. क्षुल्लक कारणावरून त्यानं तिच्याशीं भांडण उकरून काढलं अन् शेवटीं आद्रिअँचं नांव वेडंवाकडं उच्चारीत त्यानं सुझानला तिच्या प्रथम प्रेमाची जाणीव करून दिली.

" होय. होता माझा तो प्रियकर. मग काय तुझं म्हणणं आहे ! प्रत्येकाच्या विवाहपूर्व जीवनांत एखादं प्रेमप्रकरण दडलेलं नसलं तरच नवल ! तुझ्याहि तारुण्यांत एखादी युवती येऊन गेली नसेल कशावरून ? "

" समजलं. बाजू अंगावर आली म्हणजे माणूस असाच प्रत्यारोप करतो. तोंड मीट आतां ! "

रागारागानें दनी बोलून गेला खरा; परंतु संतापाचा पारा किंचित् उतरल्यावर त्याच्या डोळ्यांपुढें बालपणची मैत्रीण मारी उभी राहिली. तिच्याशीं केलेल्या प्रेमचेष्टा आठवल्या. तो शरमला. आणि त्याला अशी साधार भीति वाटूं लागली कीं जर सुझाननेंहि आपल्यावर असाच प्रयोग केला तर !

एक दिवस सुझानला यंत्राचें गुपित कळलें. दनी भयभीत झाला. पलंगाखालीं यंत्र नाहीं ना म्हणून तो वारंवार वांकून पाही. खुर्चीखालीं कोठें दडविलेलें नाहीं ना म्हणून तो खुर्ची तपाशी. मारीबद्दल कधींच आठवण काढावयाची नाहीं असा त्यानें निश्चय केला. पण माणसाचे निश्चय ढांसळतात अन् ज्या गोष्टी विसरावयाचा आपण प्रयत्न करतों त्या दुप्पट जोरानं डोळ्यांपुढं उभ्या राहातात. आणि प्राध्यापक असल्यामुळें दनी बराच गाफीलहि होता. तेव्हां सुझाननं त्याच्या विचारांची चोरून नोंद केली असल्यास नवल नाहीं.

" मारीशींच तूं लग्न करायचं होतस ! " संधि सांपडतांच सुझाननं त्याला सुनावलं. दनी दचकला. त्यानं पत्नीची क्षमा मागितली :

" सुझान, लाडके, माफ कर. मारीची आठवण मला येते. पूर्वीच्या गोड स्मृती व सुखस्वप्न यांत आपण कांहीं क्षण दंग झालों तर बिघडलं कोठं ? लग्नानंतर मी मारीची कधींहि गांठ घेतली नाहीं. "

" अन् मी तरी आद्रिअँला कधीं भेटलें आहें ! "

" जाऊं दे. एक प्रकारें झालं तें ठीक झालं. एकमेकांचें पूर्वचरित्र आपणाला कळल्यामुळं







आपलीं मनं आतां साफ झालीं आहेत. यापुढें आपल्या दोघांत कधींहि आडपडदा राहणार नाहीं." असं म्हणत त्यानं सुझानच्या खांद्यावर प्रेमानं हात ठेवला अन् एकमेकांच्या दीर्घ आलिंगनांत तीं आपलं भांडण पार विसरून गेलीं.

यंत्राच्या यशस्वितेबद्दल आणखी पुरावा कोणता हवा ?

यंत्राचा विशेष प्रभाव फुटबॉल सामन्याच्या प्रसंगीं दिसून आला. अमेरिकन विश्वविद्यालयांत अभ्यासापेक्षां खेळांना प्राधान्य फार. सामन्यांत हार खाणें, त्यांना युद्ध हरल्यासारखें वाटतें. गेल्या चार वर्षांत त्यांच्या विद्यापीठाला फुटबॉलमध्यें जय मिळाला नव्हता. खेळाडू आपल्या परी शिकस्त करीत, डावपेंच लढवीत. परंतु विरुद्ध संघाच्या युक्त्याप्रयुक्त्यांपुढें त्यांचा टिकाव लागत नसे.

विरोधी संघाचा कर्णधार हा, निर्णायक सामन्याच्या आदल्या दिवशीं, प्रतिपक्षावर कशी मात करावयाची याची संपूर्ण योजना मनाशी आंखून ठेवी. ही योजना तो अगदीं गुप्त राखी. खेळायला सुरुवात होईपर्यंत आपल्या संवगड्यांना सुद्धां तो तिचा पत्ता लागूं देत नसे.

तेव्हां यशाची गुरुकिल्ली या योजनेंत आहे, हें ओळखून ती चोरण्याचा बेत हिकेच्या विद्यापीठ-संघानें रचला. संघनायकानें विरोधी पक्षाच्या कर्णधाराच्या घरचा नोकर वश करून, त्याच्या करवीं हिकेचें यंत्र त्याच्या खोलींत ठेवून दिलें.

फुटबॉलचा सामना अत्यंत चुरशीचा झाला. हिकेच्या विद्यापीठाला विजयश्रीनें माळ घातली. या विजयानें यंत्राचें गुपित फुटलें. हिकेनें लागलीच पेटंट घेतलें. सरकारतर्फे त्याला मोठें इनाम मिळालें. आतां त्याच्याभोंवतीं यंत्र तयार करण्याचा मक्ता मिळविण्यासाठीं स्पर्धा करणाऱ्या कारखानदारांचा गराडा पडला. शेवटीं एका धनिकानें मक्ता पटकावला व हिकेला भागीदार केलें.

यंत्राचें उत्पादन जोरांत चालूं झालें. सर्व लहान मोठ्या दुकानांतून तें विक्रीला ठेवण्यांत आलें. वर्तमानपत्रें व मासिकें यांतून त्याच्या विविध रंगांत जाहिराती फडकल्या. विकत घेणाऱ्या गिऱ्हाइकांच्या रांगा दुकानांसमोर दिसूं लागल्या. नावीन्याचं इतकं वेड इतरत्र दृष्टीस पडणं कठीण.

हिके आतां खूप श्रीमंत झाला. परंतु जुन्या स्नेह्यांना विसरण्याइतका तो कृतघ्न नव्हता. यंत्राच्या अमाप यशांत दुमुलेचा थोडा हातभार होताच. तेव्हां दुमुलेला फ्रान्समधील आपला प्रमुख प्रचारक नेमण्याचं हिकेनं टरविलं.

आपल्या वृत्तीनुसार दनीनें वरील विनंतीला नकार दिला. वेड्याला पैशापेक्षां वाङ्मयाचं आकर्षण अधिक होतं. पण—सुझान थोडीच स्वस्थ बसणार !

"दनी, ही सुवर्णसंधि तूं दवडूं नकोस. पैसा ही कामधेनु आहे. तुझीं न खपणारीं पुस्तकें पैशाच्या जोरावर जाहिरात करून खपतील. टीकाकार तुला विकत घेतां येतील. तुझं लिखाण तुला स्वतःच छापून प्रसिद्ध करतां येईल. प्रकाशकांची मनधरणी करण्याची तुला जरूरी पडणार नाहीं."

सुझानचं म्हणणं दनीला कितपत पटलं हें सांगणं कठीण. परंतु त्यानें हिकेच्या विनंतीला लवकरच होकार दिला हें निश्चित.

पॅरिसमधील 'शाँ झे लीजे' राजपथावर दुमलेनें आपली भव्य कचेरी उघडली. हाताखालीं पांचपंचवीस माणसं, व तैनातीला कोरी करकरीत अमेरिकन मोटार पाहून सुझानला अस्मान् अगदीं ठेंगणें वाटूं लागलें.

यंत्राचा खप अतोनात होऊं लागला. हिकेवर लोकांनीं स्तुतिसुमनें उधळलीं.

परंतु काय आश्चर्य ! चार महिने लोटले नाहींत तोंच गिऱ्हाईकांची रीघ ओसरूं लागली. विरोधी प्रचाराचे सूर कांहीं पत्रांतून येऊं लागले. इतकेंच नव्हे तर दुकानावर निरोधन करण्याचा घाट कांहीं मंडळींनीं घातला.

फ्रान्समधील वारंवार गडगडणारीं व परदेशांत चेष्टेचा विषय बनलेलीं मंत्रिमंडळें स्थिर करावींत हा उच्च हेतु मनांत बाळगून कांहीं तरुण, उत्साही राजकारणी कार्यकर्त्यांनीं प्रयत्न सुरू केले.

विरोधी पक्षप्रमुखांची आपणांबद्दलची भूमिका त्यांनीं यंत्रांच्या साहाय्यानें समजावून घेऊन










समेटाचा प्रयत्न केला. त्यांच्या म्होरक्यानें पक्षाच्या सभेंत तसा मसुदा मांडला; परंतु त्याचें भाषण पुरतें ऐकून घेण्यासहि कोणी राजी नव्हतें.

" ओढा त्याला व्यासपीठावरून. सवाळ व पड-खाऊ धोरणाचा पुरस्कार करणारावर शिस्तभंगाचा बडगा उगारा." अशा आरोळ्या चोहोंकडून येऊं लागल्या. शेवटीं अतिप्रसंग टाळावा म्हणून अध्यक्षानें सभा विसर्जन केली.

एकमेकांचा दृष्टिकोन समजल्यावर औद्योगिक क्षेत्रांतील मालक-मजूर तंटा मिटेल अशी आशा बऱ्याचजणांनीं उराशीं बाळगली होती. तथापि, प्रत्यक्ष अनुभव मात्र उलटाच आला.

सहानुभूतीच्या शब्दांमागें मालकांच्या मनांत दडून असलेला मजुरांविषयींचा तिरस्कार, कमींत कमी मजुरी देऊन जास्तींत जास्त राबवून घेण्याचा त्यांचा बेत, पाळीव जनावरांपेक्षांही खालच्या दर्जाची वागणूक देण्याची त्यांची वृत्ति, हें सर्व मजुरांच्या ध्यानांत आलें. याउलट, संपाचें हत्यार वेळींअवेळीं उपसून, जास्त पगार उपटण्याचा मजुरांचा मानस मालकांना कळून चुकला. द्वेष व मत्सर यांच्या अर्कांत बुडवून काढलेलीं त्यांचीं मनें स्पष्टपणें दिसून आलीं.

दोघांत अगोदरच असलेलें खिंडार आणखी रुंदावलें.

शिक्षणक्षेत्रांतहि असेंच बिंग बाहेर पडलें. 'शिक्षक म्हणजे दिवसांतले कांहीं तास, पुस्तकांतला मजकूर पाठ करून बडबडणारं यंत्र' अशा नजरेनं शिक्षकाकडे पहाणारं विद्यार्थ्यांचं मन; मुलांना कळो वा न कळो, अशा वृत्तीनं शिकवीत, महिन्याच्या पगारावर खिळून राहाणारं शिक्षकांचं मन; या दोन मनांचीं प्रतिबिंबें स्पष्ट दिसून आलीं.

अशा तऱ्हेनं प्रत्येक क्षेत्रांत यंत्र अपेशी ठरलें.

एवंच काय, प्रत्येकजण आपल्या एकदां स्वीकारलेल्या भूमिकेला चिकटून राहाण्याचा दुराग्रह बाळगतो, दुसऱ्याचें मनोगत उमगल्यावरसुद्धां तो समेटाला तयार नसतो; मानवी स्वभाव अनादि-काळापासून जसा होता तसाच आजहि आहे, हें कटु सत्य बाहेर आलें. म्हणूनच, ज्या यंत्राचा सुरुवातीला इतका गाजावाजा झाला, ज्यावर बऱ्याच जणांच्या आशा खिळून राहिल्या होत्या, ज्याच्या साहाय्यानें मानवी जीवन सुखमय होईल असें कांहींना वाटत होतें, तें हिकेचं विचारलेखक यंत्र शेवटीं, एका जुन्यापुराण्या वस्तूंच्या दुकानांत धूळ खात पडलं ! !

---

## कबुतरांची गेल्या महायुद्धांतील कामगिरी

लष्करी कामगिरीवर धाडण्यांत येणाऱ्या कबूतरांचा राजा ' जी. आय. ज्यो ' नांवाचें कबूतर आहे. त्याचें वय ८ वर्षें म्हणजे कबूतरांचें मध्यम वय आहे.

१८ आक्टो. १९४३ सालीं जर्मन सैन्य इटलींत कोल्व्ही व्हेकिया या ठिकाणीं असतां ब्रिटिश लष्करानें आपल्या विमानदलाची मदत त्याचा धुव्वा उडविण्यासाठीं मागितली. वैमानिकांची मदत येण्यापूर्वींच ब्रिटिश तुकड्या त्या गांवांत शिरल्या आणि परिस्थिति अशी आली कीं त्यांच्याच विमानांतून त्यांच्याच सैन्यावर मारा होणार ! अशा वेळीं त्या शहरावर बॉंबवर्षाव करण्याचा पूर्वींचा हुकूम रद्द करणारा संदेश घेऊन हें कबूतर 'ज्यो' निघालें. २० मैलांचें अंतर २० मिनिटांत कापून 'ज्यो' अगदीं ऐन वेळीं विमानतळावर येऊन पोंचलें व सैनिकांचे प्राण त्यानें वांचविले.

ब्रह्मदेशांतून ब्रिटिशांचें सैन्य माघार घेत असतां मागें अडकून पडलेल्या एकाकी तुकडीकडे महत्त्वाच्या माहितीसाठीं एक कबूतर पाठविण्यांत आलें. ही " ब्रह्मदेशाची राणी " तेथें जाऊन ती माहिती घेऊन परत आली. ब्रह्मदेशातील प्रचंड पर्वतांवरून उड्डाण करून तिनें ३२० मैलांची मुसाफरी केली होती.

—" सायन्स् डायजेस्ट ", नोव्हें. ५०



अनुक्रमणिका






प्रा. प्र. रा. दामले

# पुणें विद्यापीठाचीं पहिलीं तीन वर्षें

मुंबई राज्यास पूर्ण स्वायत्तता मिळाल्यानंतर जीं अनेक ध्येयें प्रत्यक्षांत आलीं, त्यांतलें एक 'पुणें विद्यापीठा'ची स्थापना हें होय. शिक्षणक्षेत्रांत, निदान गेलीं पंचवीस वर्षें, या विद्यापीठाच्या स्थापनेबद्दल विचार चालूं असून विद्यापीठाबद्दलच्या आकांक्षा वरचेवर प्रगट केल्या जात होत्या. गेल्या तीन वर्षांत या विद्यापीठाच्या विविध मंडळांतून अनेक विषयांवर चर्चा झाली व निर्णय घेतले गेले. त्याबद्दल महत्त्वाचे मतभेद झाले व आहेत. तरी पण, विद्यापीठाची स्थापना सर्वांसच स्वागतार्ह वाटते. कोणाचाहि विद्यापीठास विरोध नाहीं. इतकेंच नव्हे तर विद्यापीठाची सर्वांगीण प्रगति व्हावी याबद्दल दुमत नाहीं.

'पुणें विद्यापीठा'स प्रारंभ होऊन तीन वर्षेंच होत आहेत. तीन वर्षांचा अवधि विद्यापीठासारख्या संस्थेच्या कार्याचें मूल्यमापन करतां येण्यास पुरेसा नाहीं, हें जरी खरें असलें तरी या अवधींतील घटनांचें स्थूल समालोचन करणें भावी प्रगतीच्या दृष्टीनें आवश्यक व इष्ट आहे.

महाराष्ट्र प्रांत गरिबांचा असल्यामुळें द्रव्याची अडचण ही फार महत्त्वाची अडचण या विद्यापीठास नेहमींच भासणार. सरकारी मदतीकरितां आतां सहा विद्यापीठें, व शेंकडोंनीं वाढणाऱ्या प्राथमिक व दुय्यम शिक्षणसंस्था सिद्ध असल्यानें ती मदतहि आजच्यापेक्षां फार अधिक मिळणें दूरापास्तच आहे. आपल्या देशांतील विद्वत्तेचा दर्जा व ज्ञाननिष्ठा यांचें प्रमाण असावें तसें नाहीं, ही वस्तुस्थिति आहे. ही वस्तुस्थितिहि इतर विद्यापीठांप्रमाणें 'पुणें विद्यापीठा'च्या प्रगतीसहि बाधक आहेच. विद्यालयीन अध्ययन, अध्यापन व संशोधन या बाबतींत आपल्या इकडे योग्य संवयी व योग्य दृष्टिकोन फारच थोड्यांना आहे, म्हणूनच आपली वर्तमान परिस्थिति लक्षांत घेऊन आज आपणांस झेंपतील तेच उद्योग हातीं घेतले, तरच यशाचा संभव आहे. विद्यापीठाला मिळालेली गणेशखिंडीची जागा शहरापासून व घटक संस्थांपासून बरीच दूर असल्यानें विद्यापीठीय कार्याच्या समन्वयास गैरसोयीची आहे, हें खरें. परंतु गणेशखिंडीचें विस्तीर्ण व भव्य आवार व तेथें असलेल्या इमारती विद्यापीठास मिळाल्या आहेत, ही विद्यापीठाच्या भावी प्रगतीच्या दृष्टीनें फार हितावह घटना आहे. विद्यापीठानें नवे व स्वतंत्र उद्योग जे हातीं घ्यावयाचे, त्यांसाठीं ही जागा अतिशय सोयीची आहे. आजहि युनिव्हर्सिटीच्या कचेरीशिवाय वसतिगृह, छापखाना काहीं संशोधनखातीं, हीं तेथें आहेत व त्या सर्वांचा उत्तम तऱ्हेनें विस्तार येथें होऊं शकेल. ही मिळकत हें विद्यापीठाचें खरेंखुरें वैभव आहे. अर्थात् त्याचा योग्य उपयोग करणें, हें आपल्या शहाणपणावर अवलंबून आहे.

विद्यापीठाची खरी संपत्ति म्हणजे पुण्यांतील निरनिराळ्या शाखांचीं सरकारी व बिनसरकारी सुसज्ज महाविद्यालयें व संशोधनसंस्था ही होय. पैशांत कांहीं कोटींनीं मोजतां येईल अशी ही मिळकत आहे. या संस्थांच्या इमारती व त्यांत असलेली साधनसामग्री यांनीं विद्यापीठाचा अध्यापनाचा सर्व-सामान्य संसार प्रायः चालण्यासारखा आहे. शिवाय त्यांतील बिनसरकारी संस्थांमध्यें अल्पवेतनावर आवडीचें शिक्षणकार्य करणाऱ्या व्यक्ती आहेत.










# पुणें विद्यापीठाचीं पहिलीं तीन वर्षें

सुमारें ७५ वर्षांपूर्वी चिपळूणकर, टिळक, आगरकर, गोखले या लोकाग्रणींनीं सुरू केलेल्या महाराष्ट्रांतील अभिनव व ध्येयवादी शिक्षणप्रयोगांच्या या प्रयोग-शाळा अद्यापिहि या संस्थांतून चालू आहेत. अखिल हिंदुस्थानांत या संस्था अजूनहि या बाबतींत अग्रस्थानींच आहेत. पुण्यांतील या शिक्षणसंस्थांची पूर्वपीठिका व चालू कार्य इतकीं उज्ज्वल आहेत कीं, दरिद्री विद्यापीठाची ती बिनमोल संपत्तिच आहे. त्यांकडे विद्यापीठानें पाठ फिरवूं नये. या शिक्षण-संस्थांच्या महाविद्यालयांना कायद्यानें विद्यापीठाचीं घटकविद्यालयें केलीं आहेत. मनानेंहि तीं विद्यापीठाचींच आहेत. अनेक कारणांमुळें या शिक्षणसंस्थांतून कांहीं दोष आले आहेत. पण दोष कशांत नसतात ? त्यांच्या कार्याकडे दोषैक-दृष्टीनें व त्यांच्या अस्तित्वाकडे अविश्वासानें न पाहतां त्यांचा अधिकांत अधिक उपयोग करून घेतला गेला तर, विद्यापीठाला कांहीं कमी पडणार नाहीं.

विद्यापीठाची पहिल्या तीन वर्षांत काय प्रगति झाली, याचा विचार केल्यास खालील गोष्टी दृष्टोत्पत्तीस येतात. मुंबई राज्यांतील हें पहिलेंच प्रादेशिक विद्यापीठ असल्यामुळें सर्वच गोष्टी नव्यानें करावयाच्या होत्या. कुलगुरु, पुण्यांतील अनुभवी शिक्षणतज्ज्ञ व्यक्ती व विद्यापीठाचे रजिस्ट्रार यांनीं पुष्कळ श्रम घेऊन अनेक प्रास्ताविक, व प्रारंभींचीं कामें केलीं. प्रथमवर्षापासून उत्तम रीतीनें परीक्षा घेतल्या गेल्या. कांहीं विषयांत प्राध्यापक नेमिले गेले व त्यांच्या कामास प्रारंभ झाला. छापखाना व्यवस्थित सुरू केला गेला. पदव्युत्तर ' आर्ट्स् ' शाखेचें अध्यापन गणेश-खिंडींत व बी. ए. बी. एस्सी. चें अध्यापन व संशोधन शहरांतील केंद्रांतून विद्यापीठानें निवडलेल्या प्राध्यापकांकडून केलें जाऊं लागलें. पुणें विद्यापीठा-च्या निमंत्रणास मान देऊन भारतीय शास्त्रपरिषदेचें अधिवेशन गतवर्षी येथें भरवण्यांत आलें. त्याची व्यवस्था उत्तम झाली. त्या निमित्तानें त्याच्याच आधीं व नंतर अनेक जगद्विख्यात् शास्त्रज्ञ व इतरहि अनेक युरोपीय व अमेरिकन विद्वान् यांनीं विद्यापीठास भेट दिली. त्यांचीं व्याख्यानेंहि करविलीं गेलीं. पुणें विद्यापीठातर्फे ' बहिःशाल ' ( Extra-mural ) व्याख्यानमालेसहि सुरुवात झाली आहे. झालें हें कांहींच नाहीं, किंवा हें करण्यास अनेकांचे श्रम कारणीभूत झाले नाहींत असें कोणीच म्हणत नाहीं. प्रश्न इतकाच आहे कीं विद्यापीठाच्या खऱ्या प्रगतीच्या दृष्टीनें या कार्याचें समालोचन केल्यास कांहीं दोष प्रत्ययास येतात का ? सुधारणा कोठच्या बाबतींत करण्यासारखी आहे ? याचाच विचार करावयाचा आहे.

करण्यासारख्या असून केल्या गेल्या नाहींत, अशा कांहीं लहान मोठ्या बाबी अनेक आहेत. प्राध्यापकमंडळींनीं अनेक शिकवण्या करणें, गाइड-बुकें लिहिणें व तत्सम उद्योग करणें यानें शिक्षणाचा दर्जा निकृष्ट होतो, हें स्पष्टच असल्यानें त्या बाबतींत सामान्य नियम घालून द्यावेत अशी सूचना स्वतः लेखकानें दोन वर्षांपूर्वी केली. ती किंवा तसली दुसरी सूचना मान्य नव्हेच पण विचारांतहि घेतली गेली नाहीं. विद्यापीठाचा स्वतःचा छापखाना असून व केवळ पुणें शहरांतच पदव्युत्तर परीक्षांकरितां अध्यापन करणारे व संशोधन करणारे सुमारें ५० प्राध्यापक असूनहि, अद्यापि विद्यापीठाचें नियत-कालिक ( journal ) निघालें नाहीं व तें सुरू होणार कीं नाहीं, तेंही कळत नाहीं. इतर अनेक व्यवसायांप्रमाणें याहि व्यवसायांत चालढकलीच्या संबधी सर्वांस व विशेषतः विद्यार्थ्यांस फार लागलेल्या आहेत. त्यांची सुधारणा व्हावी म्हणून टर्मचे सर्व दिवस ( योग्य कारणाकरितां रजा मुख्याध्यापकांकडून घेतली नसेल तर ) उपस्थिति अवश्य असावी व जातधर्मवार किरकोळ व अनियमित येणाऱ्या सुट्या देणें बंद करावें, हीहि एक सूचना होती. ती अंमलांत आली असती तर अभ्यास अधिक झाला असता; इतकेंच नव्हे तर, प्राध्यापकांच्या व विद्या-र्थ्यांच्या वृत्तींतील शिथिलपणा कमी झाला असता. पूर्वी मुंबई विद्यापीठाच्या कार्याबद्दल वेळीं-अवेळीं टीका करतांना ज्या पुणेंकर प्राध्यापकमंडळींनीं, मुंबई विद्यापीठांत अलीकडे फार बोकाळलेलीं दोन न्यूनें--म्हणजे सकाळचे कांहीं तासांतच कांहीं वर्गांचें शिक्षण आटोपणें, व वर्गांतील विद्यार्थ्यांची संख्या केवळ खोल्यांचा आकार, मेजांची संख्या वगैरे





अनुक्रमणिका

बाह्य बाबींवर ठरवून ती १५० पर्यंत वाढूं देणें— यांवर झोड उठविली, त्याच प्राध्यापकमंडळींनीं पुणें विद्यापीठांत याबाबत अद्यापि कांहीं केलें नाहीं ! विद्यापीठांचें मुख्य स्थान शहरापासून बरेंच दूर असल्यानें उत्तम व्यवस्थेनें चालविलेलें व महाग नसलेलें उपाहारगृह व वसतिगृह हीं सर्वांत आधीं व्हावयास पाहिजे होतीं. त्यांचा अद्याप मागमूस नाहीं. अध्यापकांच्या मार्गदर्शनाखालीं स्वाध्यायपद्धति (Tutorial System) या वर्षीं सुरू झाली आहे, ती नाममात्रच म्हटली पाहिजे. कांहीं लेखी निबंध लिहून घेऊन तपासून येणें यापेक्षां त्यांतून अधिक अपेक्षा करतां येत नाहीं. कारण विद्यार्थ्यांच्या संख्येच्या मानानें अध्यापकां-( Tutors )-ची संख्या कमी आहे. जें इंटरमीजिएटनंतरचें शिक्षण विद्यापीठ स्वतः चालविलें त्या बाबतींतहि तें वेगळा असा कांहीं खर्च करीत नाहीं. मग इंटरमीजिएटपर्यंत कांहीं अर्थीं अधिक अवश्य असलेलें ट्यूटोरिअल कार्य करण्याला घटकविद्यालयांना मदत देणें दूरच राहिलें ! या झाल्या किरकोळ पण महत्त्वाच्या व सहजसाध्य बाबी. दुसऱ्या टोंकाला शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न. तो प्रश्न सोपा नाहीं; सरकारी शिक्षणखात्याप्रमाणें गर्दीनें निरनिराळे हुकूम काढून हाताळण्यासारखा नाहीं. तो महत्त्वाचा व निकडीचा प्रश्न आहे. तो सोडविण्याच्या दृष्टीनें विचार-पूर्वक व पद्धतशीर प्रयत्न तांबडतोब सुरू होणें जरूर होतें. परंतु अद्यापि त्याबाबत एकही निर्णय घेतला गेलेला नाहीं. विद्यापीठाच्या 'कोर्टा'च्या सभेंत या विषयावर ठराव मांडले गेले. पण ही बाब केवळ शैक्षणिक आहे, सबब ती शिक्षणतज्ज्ञ-मंडळाच्या कक्षेंत येते, या सबबीवर ते फेटाळले गेले. पण तीं 'मंडळें' तर कांहीं करीत नाहींत ! अशी वस्तुस्थिति आहे. उच्च बौद्धिक निष्ठा व धैर्य, व्यावहारिक तारतम्य या दोहोंचा समन्वय असेल तरच हा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटेल. कॉंग्रेस शिक्षणखात्याप्रमाणें आमच्या विद्या-पीठाच्या व्यवस्थापकमंडळांनींहि या प्रश्नाबाबत मूलभूत विचार केलेला दिसत नाहीं. नवे मोठे बदल आत्मसात् करण्याची धमक त्यांच्यामध्यें दिसून येत नाहीं. उलट, याबाबत तत्त्वतः योग्य निर्णय घेतल्यावर ज्या अनेक व्यावहारिक अडचणी येण्याचा संभव आहे त्यांना तोंड देणें कसें शक्य आहे, याचाहि त्यामुळें विचार होत नाहीं. महाराष्ट्रा-सारख्या पुढारलेल्या प्रांतांत, मराठीइतकी प्रगत मातृ-भाषा असणाऱ्या शिक्षणज्ञांकडून, स्वतंत्र विद्यापीठ झाल्यावरहि, या अत्यंत मूलभूत प्रश्नाची अशी हेळ-सांड व्हावी, ही अतिशय खेदाची गोष्ट होय. विद्या-पीठाचें कार्य वाढीस लागावयाचें तर द्रव्य पुष्कळच लागेल व तें मिळविण्यास परिश्रम करावे लागतात, हें ज्यांनीं सार्वजनिक संस्थांकरितां तें मिळविण्याचा प्रयत्न केला त्यांस माहीत आहे. तसा फारसा प्रयत्न विद्यापीठातर्फे झाला, असें म्हणतां येणार नाहीं. या तीन वर्षांत अनेक मध्यम-वर्गीय महाराष्ट्रीयांनीं स्वयंस्फूर्तीनें विद्यापीठास लहानमोठ्या देणग्या दिल्या. परंतु आज हातीं घेतलेल्या व पुढें घेणें अवश्य आहे अशा कार्याच्या दृष्टीनें त्या अगदींच अपुऱ्या आहेत. कुलगुरु डॉ. जयकर यांनीं कांहीं देणग्या मिळ-विल्या. परंतु त्यांचें वय लक्षांत घेतां या कामाची दगदग विद्यापीठातर्फे दुसऱ्या कांहीं व्यक्तींनीं उचलणें जरूर होतें. तें अद्यापि झालें नाहीं. नवे व विशिष्ट मूल्याचे असे उद्योग विद्यापीठ हातीं घेईल व त्याकरितां आपले साधनसामग्रीचें व मनुष्य-बळाचें जतन करील तरच, निधि मिळविणें सोपें होईल.

आज केल्या नसल्या तरी चाललें असतें, इतकेंच नव्हे तर आजच्या परिस्थितींत न करणें बरें झालें असतें, अशा अनेक गोष्टी 'पुणें विद्यापीठां'त केल्या गेल्या आहेत. माझ्या मतें पहिली गोष्ट म्हणजे विद्यापीठानें स्वतःचे असे अनेक प्रोफेसर व 'रीडर' नेमले, यांत आपल्या ऐपतीचा विचार केला नाहीं. या योगानें शेवटीं सर्वच शाखांची गैरसोय व उपासमार होण्याचा संभव आहे. उलट, दोनतीनच शाखा सुरू केल्या असत्या तर, त्यांकरिता शक्य तितक्या जास्त पगारावर उत्तम तज्ज्ञ नेमतां आले असते व त्यांस लागेल तितकी साधनसामग्री देऊन त्यांच्या हाता-खालीं पुढील कांहीं वर्षांत येथें संशोधनपद्धति शिक-लेले तज्ज्ञ निर्माण करतां आले असते. दुसरी लहानशीच परंतु एका अर्थी महत्त्वाची बाब 'बाह्य










पदवी-( External Degrees )-स्थापने 'ची. माझ्या मतें विद्यापीठानें याबाबत निष्कारण घाई केली व भलत्याच बाबतींत तडजोड करण्याचा पायंडा घातला. पुणें विद्यापीठाच्या पदवीचें मूल्य काय, तें अजून ठरावयाचें आहे. अशा वेळीं विद्यालयांत शिस्त, नियमित अभ्यासक्रम इत्यादि बाबतींत अपवाद वाढतील अशा घटना उत्पन्न करणें किंवा होऊं देणें, हें अनिष्ट होय. या दृष्टीनें इतर शहरांप्रमाणें पुण्यांतहि कांहीं होतकरू तरुणांस आर्थिक परिस्थितीमुळें महाविद्यालयीन शिक्षणाचा लाभ घेणें कठिण जातें, इतक्याच कारणाकरितां कांहींहि अभ्यासक्रमाची शिस्त न ठेवतां, कोठच्याही अर्थोत्पादक व्यवसायांत असणाऱ्या कोणाही स्त्रीपुरुषास एम्. ए. पर्यंतच्या पदवी-परीक्षेस बसूं देणें ही घटना 'क्रांतिकारक' ( radical ) असली तरी विद्यापीठाच्या पदव्या व शिक्षण यांच्या दर्जास धोका आणणारी म्हणून, ( retrograde ) परागतिकारक ठरणारी आहे. या विद्यार्थ्यांच्या ज्ञानलालसेचें चीज करण्याचे दुसरें मार्ग होते. त्यांतील विशेष बुद्धिमान् विद्यार्थ्यांना विद्यापीठांत येऊन अभ्यास करण्याची सवड असावी, याकरितां शक्तीप्रमाणें विद्यापीठानें मदत केली असती तर तेंही योग्यच झालें असतें. परंतु आधींच अनियमितपणा, हेळसांड व रोजच्या रोज अभ्यास करण्याच्या संवयींचा अभाव—या प्रवृत्ती विद्यार्थ्यांमध्यें बोकाळल्या असतांना कांहींहि नियमित अभ्यासक्रम न अनुसरणाऱ्या व ज्यांच्या रोजच्या उद्योगाचा बौद्धिक जीवनाशीं कांहींही संबंध नाहीं अशा विद्यार्थ्यांस आपल्या परीक्षांस बसूं देऊन, आपल्या परीक्षांची आपणच थट्टा करणें व शेवटीं परीक्षांचा व अध्ययनाचा दर्जा खालीं आणणें, हें विद्यापीठानें कधींही—निदान आपल्या प्रारंभावस्थेंत तरी—करण्यांत काय साधलें हेंच समजत नाहीं. घटक व संलग्न संस्थांमधील प्राध्यापकांच्या वयोमर्यादेबद्दल जो नियम विद्यापीठानें मंजूर केला आहे त्याच्या कायदेशीरपणाबद्दल मतभेद आहे. परंतु तो कायदेशीर असला तरी निदान आज त्याचा अंमल करण्याची आवश्यकता नव्हती. खरोखरीं, विद्यापीठास कार्यकर्ते कमी पडतात; म्हणून ज्या त्या संस्थेंत त्यांच्या नियमानुसार ज्या व्यक्ती अध्यापन करण्यास योग्य समजल्या जातात, त्यांस व्यक्तिशः त्यांचें काम असमाधानकारक असल्याचें आढळून येईपर्यंत, केवळ अमुक एक वयोमर्यादा उलटली म्हणून प्राध्यापक राहण्यास अयोग्य म्हणावें, याचा अचंबा वाटतो ! आपल्या नोकरांपुरते हे नियम करणें ठीक म्हणतां येईल. त्यांतहि अनेक उत्कृष्ट जगन्मान्य विद्यापीठांतही प्राध्यापकांस वयोमर्यादा अशी नसतेच. कारण, प्रकृति ठीक असेल तर अनुभवाची व विचारांची परिपक्वता इत्यादि दृष्टींनीं ज्येष्ठ असे प्राध्यापक स्फूर्तिस्थानें म्हणून अतिशय उपयुक्त असतात.—अशा आणखी अनेक लहानमोठ्या बाबींचा उल्लेख करतां येईल. या सर्वांचें तात्पर्य हेंच कीं, आपलें सामर्थ्य व परिस्थिति यांचा सर्व बाजूंनीं विचार करतां, अनेक सकृद्दर्शनीं बऱ्या वाटणाऱ्या गोष्टीही करणें कांहीं वेळां अनिष्ट ठरतें.

विद्यापीठाच्या कायद्यान्वयें पुणें हद्दींतील इंटरमीजिएटनंतरच्या शिक्षणाची जबाबदारी विद्यापीठावर सोंपविली आहे. ह्या शिक्षणाच्या व्यवस्थेचा प्रश्न हा बराच गुंतागुंतीचा व वादग्रस्त असा झाला आहे. विद्यापीठाचे घटक म्हणून निरनिराळ्या शाखांचीं सरकारी व बिनसरकारी महाविद्यालयें, डेक्कन कॉलेज अॅन्ड पोस्टग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिटयूट व भांडारकर ओरिअेंटल रिसर्च इन्स्टिटयूट इत्यादि संशोधनसंस्था आहेत. ह्या शहराच्या निरनिराळ्या भागांत आहेत. विद्यापीठाची स्थापना होईपर्यंत एम्. ए., एम्. एस्सी, पीएच्. डी. पर्यंत अध्यापन व संशोधन या संस्थांतून होत होतें. ह्या संस्थांच्या अस्तित्वाकडे विद्यापीठास पाठ फिरवितां येत नाहीं. कारण, विद्यापीठाचें स्वतःचें द्रव्यबळ व साधनसामग्री आपणांवर सोंपविलेल्या सर्व शिक्षणाचें कार्य करण्यास पुरेशीं नाहींत. या संस्था स्थावर असल्यानें त्या एका ठिकाणीं आणता येत नाहींत. म्हणूनच या विविध संस्थांच्या कार्याचा समन्वय कसा करावा, याकरितां कायद्यानें 'बोर्ड ऑफ युनिव्हर्सिटी टीचिंग' नांवाचें एक कायमचें मंडळ स्थापन केलें आहे. पुण्यातील इंटरमीजिएटनंतरचें व इतरत्र विद्यापीठाच्या सर्व क्षेत्रां-( University Area )-मधील पदव्युत्तर अध्यापन व संशोधन यांची योग्य व्यवस्था करणें व त्यासाठीं योग्य व








आवश्यक त्या योजना करणें, हें या मंडळाचें कार्य होय. हें अर्थातच सोपें व धोपटमार्गी नाहीं. कारण ह्यांत अनेक कार्यक्षेत्रांचा व विविध कार्य करणाऱ्या संस्थांचा समन्वय करावा लागतो.

ह्याबाबत मुख्य मतभेद आहे तो असा कीं, कांहींच्या मतें पुण्यांतील सर्व शिक्षण शक्यतों एका केंद्रांतून व्हावें व त्या दृष्टीनें सर्व प्रयत्न व्हावेत. कायदा, स्थापत्य, वैद्यक, शेतकी, व्यापार या शाखांचें पुण्यांत प्रत्येकीं एक एकच महाविद्यालय असल्यानें व्यवहारतः त्यांचा प्रश्न सोपा आहे. त्यांचेंच चालूं असलेलें कार्य तेथेंच विद्यापीठाच्या देखरेखीखालीं चाललें म्हणजे झालें व तसेंच तें होत आहे. या सरकारी महाविद्यालयांच्या बाबत तर विद्यापीठानें कांहींहि केलें नाहीं किंवा तें कांहीं करूं शकेल, असाहि संभव नाहीं. अडचणीचा प्रश्न वाङ्मय (Arts) व भौतिक शास्त्रें यांचीं महाविद्यालयें यांबद्दलचा आहे. याबाबत 'एककेंद्रव्यवस्था' कोणाच्याहि मतें आज, व्यवहार्य नाहीं. विद्यापीठानें त्याबाबत 'द्विकेंद्र-व्यवस्था' अंमलांत आणली आहे. 'आर्ट्‌स्' शाखेकरितां सर परशुराभाऊ कॉलेज व सायन्स विषयांकरतां फर्ग्युसन कॉलेज मिळून पश्चिम केंद्र व वाडिया कॉलेज हें पूर्व-केंद्र. पश्चिम-केंद्रांत अधिक विद्यार्थी आहेत व आधिक विषयांची सोय आहे. या व्यवस्थेचा थोड्या प्रमाणांत यशस्वी झालेला हेतु असा कीं, पुण्यांतील सर्व विद्यार्थ्यांस तज्ज्ञ व अनुभवी शिक्षकांच्या अध्यापनाचा लाभ व्हावा. परंतु या व्यवस्थेंत अनेक महत्त्वाचे व्यावहारिक दोष आहेत. विद्यापीठाच्या खऱ्या स्वरूपाची व घटक विद्यालयांशीं त्यांच्या असलेल्या संबंधाची त्यांत योग्य जाणीव ठेविली गेली नाहीं. व्यावहारिक दोष मुख्यतः हे कीं, या व्यवस्थेमुळें शिक्षक व विद्यार्थी यांची अनेक प्रकारांनीं धांवपळ व गैरसोय होत असते. अनेक प्राध्यापकांस सकाळीं ७ पासून संध्याकाळीं ५ पर्यंत मधूनमधून व निरनिराळ्या ठिकाणीं काम असतें. त्यामुळें वाचन व विचार करण्यास त्यांस अवसर मिळत नाहीं. त्यांची व त्यांच्या विद्यार्थ्यांची वर्गाबाहेर गांठ पडणें कठिण होतें. विद्यार्थ्यांस आवडीचे विषय घेतां येत नाहींत किंवा घेतल्यास रोज अनेक मैलांचा प्रवास करावा लागतो. अनेकांस वाहनाचा खर्च पडतो. ग्रंथालयांचा उपयोग करणें दूरापास्त होतें. ग्रंथालयें एका ठिकाणीं, अध्यापन दुसऱ्या ठिकाणीं व राहण्याचें ठिकाण तिसरीकडे, अशी स्थिति आहे. अभ्यासमंडळें व शिक्षकांशीं वर्गाबाहेर विचारविनिमय हीं अशक्य झालीं आहेत. या व्यवस्थेंतील गुण कायम ठेवून दोष टाळतां येतील अशी एक 'त्रिकेंद्रयोजना' गतवर्षापासून अनेक वेळां चर्चिली जात आहे. त्यास बहुसंख्य प्राध्यापकांचा पाठिंबा आहे. सामान्य बी. ए व बी. एस्‌सी. पदवीचें शिक्षण तिन्हीं महाविद्यालयांत विद्यापीठानें निवडलेल्या प्राध्यापकांनीं करावें व मान-(Honours)-पदवीचें शिक्षण विषयवारीं वाटलें जावें, अशी ती योजना आहे. तिचा स्वीकार झाल्यास बऱ्याच अडचणी नाहींशा होतील व या तीनहि महाविद्यालयांचा विद्यापीठास अधिकांत अधिक उपयोग होईल. उलट, आजची व्यवस्था चालूं राहिल्यानें, व त्याहीपेक्षां 'एककेंद्रव्यवस्था' अंमलांत आल्यास, विद्यार्थी व शिक्षक यांची होणारी कुचंबणा वाढेल व शेवटीं शिक्षणाच्या दर्जावर त्याचा परिणाम होईल. हल्लींची योजना चालूं राहिल्यास अनेक नव्या प्राध्यापकांस बी. ए., बी. एस्‌सी. चें पुरेसें काम राहणार नाहीं व त्यामुळें येथील महाविद्यालयांस नवीं चांगलीं माणसें मिळणें कठीण होऊन बसेल. त्याच दर्जाचे शिक्षक पुण्याच्या बाहेरील महाविद्यालयांत एम्. ए.पर्यंत शिक्षण देऊं शकतात. पण ते पुण्यास आल्यानें त्यांची कुचंबणा होते !

इतक्या अडचणी असूनहि या त्रिकेंद्रयोजनेसंबंधीं इतका घोळ कां घातला जात आहे, याचा विचार केल्यास दोन कारणें दिसतात. एक असें कीं, कांहींच्या मतें, विशेषतः कुलगुरु (Vice-Chancellor) ना. जयकर यांच्या मतें, विद्यापीठ-कायद्यास एक-केंद्र अभिप्रेत आहे व म्हणून एखादी योजना त्यापासून जितकी अधिक भिन्न असेल तितकी ती बेकायदेशीर होते. प्रत्यक्ष आजही शास्त्राध्यापनाकरितां तीन किंवा अधिक व 'आर्ट्‌स' शाखेकरितां दोन केंद्रें मान्य केलेलीं आहेतच. परंतु ही वस्तुस्थिति








आपद्धर्म म्हणून मान्य केलेली असून एककेंद्र हेंच खरें विद्यापीठाचें ध्येय होय व त्या दृष्टीनेंच योजनेंत फरक झाला पाहिजे, असें कुलगुरूंचें मत आहे. विद्यापीठ कायद्याचा खरा अर्थ काय होतो, याबद्दल कुलपति ( Chancellor ) यांच्याकडे विचारणा केली गेली आहे व आणखीहि विचारणा होतील, असा संभव आहे.

प्रस्तुत लेखकाच्या व इतर अनेकांच्याहि मतें कुलगुरु म्हणतात असा पुणें विद्यापीठ-कायद्याचा अर्थ होऊं शकत नाहीं. विद्यापीठाचा कायदा मंजूर होत असतां येथील कांहीं संस्थांनीं सरकार-कडे त्याबाबत स्वमतप्रदर्शन ( Representation ) केलें होतें. त्यास दिलेल्या उत्तरांत या कायद्याच्या अंमलामुळें विद्यमान महाविद्यालयांचा दर्जा कमी होणार नाहीं, तसा कायद्याचा हेतु व अर्थ नाहीं, असें सरकारकडून आश्वासन देण्यांत आलें, शिवाय, विद्यापीठाला अध्यापनाचें इतकें अवाढव्य कार्य अंगावर घ्यावयाचें म्हणजे जें द्रव्य लागेल त्याकरितां आजची सरकारी ग्रँट अगदीं अपुरी आहे. ती अनेकपट वाढवावी लागेल. पण तसा कांहींच संभव नाहीं. ' बोर्ड ऑफ युनिव्हर्सिटी टीचिंग 'ची स्थापना करणें, पुण्यांतील विद्यालयांस 'घटक' म्हणणें— या कायद्यांतल्या तरतुदीं-( Provisions )-ना कांहीं अर्थ असेल, तर सर्व घटक संस्थांचें उत्तमोत्तम सहकार्य मिळेल अशी कोठलीही योग्य वाटेल ती योजना स्वीकारण्याचा ' बोर्ड ऑफ युनिव्हर्सिटी टीचिंग ' ला अधिकार असणें हें सयुक्तिकच होईल[1].

परंतु प्रत्यक्ष कायद्याच्या या अडचणींपेक्षांहि लेखकाच्या मतें खरी अडचण दुसरीच आहे. कारण आपणांस काय पाहिजे याबद्दल एकमत असेल तर कायदा जरूर तर बदलून घेतां येईल किंवा अलिखित संकेतां ( Conventions )नीं कायद्यास योग्य ती मुरड घालतां येईल. परंतु तसें ऐकमत्य आज दिसून येत नाहीं. पुण्यांत व पुण्याबाहेरील कांहीं शिक्षणज्ञांची अशी समजूत दिसते कीं, घटक संस्थांचें सामर्थ्य, स्वातंत्र्य, मोठेपणा यास मर्यादा घातल्याशिवाय विद्यापीठ मोठें होणार नाहीं. ' आमच्या विद्यालयांत आणखी विषय शिकवूं द्या ', ' आमच्या विद्यार्थ्यांची अशी गैरसोय होते ', असें कोणी म्हटलें तर त्यांत या शिक्षणज्ञांस विद्यापीठा बरील निष्ठेचा अभाव दिसतो. पुण्याच्या महाविद्यालयांतील कार्यकर्ते, आपली सत्ता कमी होईल म्हणून, विद्यापीठास मनांतून विरोधी आहेत, असें त्यांस वाटतें. कसें तरी करून विद्यापीठाच्या संपूर्ण एकछत्री हुकमतीखालीं त्यांस सर्वस्वीं आणून कारभार केला तरच शिक्षणाची प्रगति होईल, अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली आहे.

ही समजूत करून घेणें म्हणजे घटक महाविद्यालयांवर व त्यांच्या कार्यकर्त्यांवर अन्याय करणें आहे व तें विद्यापीठाच्या हितास विरोधी आहे. पुण्याच्या घटकसंस्था किंवा त्यांचे कार्यकर्ते संपूर्णपणें निर्दोष आहेत, असें कोणीच म्हणत नाहीं. पण त्या संस्था व त्यांतील कार्यकर्ते विद्यापीठाच्या प्रगतीच्या मार्गांतील धोंड नसून उलट विद्यापीठाच्या इमारतीचे ' आधारस्तंभ ' आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. विद्यापीठ व या संस्था दोन नाहींतच, म्हणून त्यांच्या हितसंबंधांत विरोध नाहीं. हीं घटक-महाविद्यालयें आतांपर्यंत आपलें कार्य कार्यक्षम रीतीनें करीत आलीं आहेत. तेव्हां त्यांचें महत्त्व ओळखल्यास त्यांचें सामर्थ्य वाढवून त्यांचे असलेले दोष कमी करतां येतील व विद्यापीठाच्या कार्यास त्यांचा उपयोग करून घेतां येईल. उलट, या महाविद्यालयांचा कारभार सरकारी खात्याप्रमाणें एकतंत्री व एकछाप करणें, त्यांच्या हल्लींच्या व्यवस्थेंत बिघाड आणणें, त्यांच्या अडचणी या विद्यापीठाच्या अडचणीच आहेत हें न समजणें, हें अतिशय अनिष्ट होय.

---

१ कुलपतींकडे ज्या विचारणा केल्या गेल्या त्याविषयीं विद्यापीठाकडे उत्तर आल्याचें कळतें. त्या उत्तराचा आशय असा असल्याचें समजतें कीं पुण्यांतील इंटरमीजिटनंतरच्या अध्यापनाची, असलेल्या परिस्थितींत योग्य वाटेल ती व्यवस्था करण्याचा विद्यापीठाच्या ' व्यवस्थामंडळा 'स पूर्ण हक्क असून विद्यापीठाचा कायदा त्याच्या आड येत नाहीं. —लेखक

शाळा जशी शिक्षकांची, तसेंच व त्या अर्थीं विद्यापीठ हें प्राध्यापकांचें असलें पाहिजे. अर्थात् खरा प्राध्यापक तोच, कीं जो स्वतः ज्ञानाची उपासना करून विद्यार्थ्यांचें ज्ञान व शील यांचें संवर्धन कसें होईल याची अहर्निश काळजी बाळगून त्याकरितां अविरत श्रम करतो. मर्यादित क्षेत्रांत व मर्यादित अर्थीं यांचीं प्रतीकें पुण्यांतील निरनिराळ्या शैक्षणिक संस्थांत आहेत. त्यांस योग्य जोम आणून व अधिक तत्त्वनिष्ठ करून त्यांतील कार्यकर्ते, त्यांचें बळ व त्यांची प्रतिष्ठा यांचा विद्यापीठानें अधिक फायदा घेतला पाहिजे. प्राध्यापकवर्गानेंहि, शैक्षणिक स्वातंत्र्याच्या जणूं मुहूर्तमेढी अशा ज्या आपापल्या संस्था, त्यांच्याशीं असलेली आपली निष्ठा विद्यापीठीय निष्ठेशीं विरोधी नाहीं, हें लक्षांत ठेवावें. विद्यापीठाच्या कायद्यांत निवडणुकीचे प्रसंग कमी केले आहेत, हें ठीकच आहे. तरी पण, शिक्षकांचा स्वाभिमान, निरपेक्षता यांवरच त्यांचें स्वातंत्र्य नेहमीं अवलंबून राहणार. विद्यापीठीय व्यवस्थामंडळाचें सभासदत्व व इतर मानाचीं व सत्तेचीं पदें हीं सहजगत्या मिळतील तर अवश्य मिळवावीं; व तेथून विद्यापीठाच्या कारभाराचें ( Administrative ) काम करतां येईल, तें करून विद्यापीठाची सेवा अवश्य करावी. परंतु अध्ययन, अध्यापन, संशोधन हें जें आपलें कर्तव्य तें निष्ठेनें केल्यानेंच विद्यापीठाची खरी सेवा होईल व आपलीहि प्रतिष्ठा राहील, ही गोष्ट विसरूं नये. पदाधिकार ही गौण बाब आहे. स्वाभिमानाशीं व आपल्या मुख्य कार्याशीं, सुसंगत अशीं असतील तेव्हांच अधिकारस्थानें स्वीकारावीं. परंतु त्यांचा हव्यास धरून आपलें स्वातंत्र्य व आपला स्वाभिमान यांस धक्का लावूं नये. प्राध्यापकवर्गापैकीं अनेकांच्या मतास विद्यापीठाच्या व्यवहारांत योग्य तो मान दिला जात नाहीं; सहकारी म्हणून नव्हे तर नोकर म्हणून त्यांच्याकडे पहाण्याची प्रवृत्ति आहे; त्यांचा अनुभव व शिक्षणाची कळकळ ही लक्षांत न घेतां नवशिक्या विद्यार्थ्याप्रमाणें त्यांना शहाणें करण्याचा प्रयत्न विद्यापीठाकडून होतो, असें वाटण्यास जागा आहे. पुण्यांतच ' युनिव्हर्सिटी टीचर्स असोशिएशन ' ही संस्था स्थापन झाली असून पुण्यांतील सुमारें १०० प्राध्यापक तिचे सभासद आहेत. त्यांतील पुष्कळांची अशीच भावना आहे, असें त्यांच्या आतांपर्यंत झालेल्या विचारविनिमयावरून वाटतें. विद्यापीठांतील अध्यापन वगैरे गोष्टींचा समन्वय (coordination) ज्या शिक्षकांनीं प्रायः अमलांत आणावयाचा आहे, त्यांच्या मतास मान न दिल्यास त्यांचें पूर्ण सहकार्य मिळणार नाहीं व यश येणार नाहीं, हें विद्यापीठाचीं व्यवस्थापक-मंडळें पुरेसें लक्षांत घेतात, असें दिसत नाहीं. विद्यापीठांत याबाबत योग्य तो दृष्टिकोन प्रभावी होण्याकरितां शिक्षक काय करूं शकतील, यांचें वर दिग्दर्शन केलें आहेच. दोन्हींहि पक्षांकडून प्रयत्न झाल्यास विद्यापीठाचें कार्य वाढीस लागेल, यांत संशय नाहीं.

याच मुद्द्यावरून दुसऱ्या एक दोन गोष्टी सुचतात, त्यांची थोडी चर्चा करणें अवश्य आहे. शिक्षक व शिक्षकेतर असे दोन प्रकारचे सभासद विद्यापीठाच्या मंडळांतून आहेत. त्यांचे दृष्टिकोन कांहीं वेळां भिन्न असतात. व विद्यापीठ ही शिक्षणसंस्था असल्यामुळें शिक्षक-सभासदांचें मत साहजिकच अधिक वेळां स्वीकार्य ठरतें. दर वेळेला शिक्षक सभासदांचेंच मत बरोबर असेल, अशी ग्वाही कोणीच देऊं शकणार नाहीं, हें स्पष्टच आहे. तरी पण, शैक्षणिक बाबतींतील निर्णय शिक्षक सभासदांच्या मताप्रमाणें झाले तर त्याचा अर्थ विद्यापीठांतील सत्तेची मिरासदारी (monopoly) त्यांनीं मिळविली आहे, असा जो समज कांहीं विद्यापीठीय सभासदांचा आहे, तो गैरसमज आहे, असें म्हटलें पाहिजे. विद्यापीठाच्या व्यावहारिक अंगाबद्दल शिक्षकेतर सभासदांच्या मतास इतर सभासदांइतकाच—थोडा अधिकही—मान असावा हें जितकें खरें, तितकेंच शैक्षणिक प्रश्न व संघटन याबद्दल त्यांच्या मतास प्रायः शिक्षकसभासदांच्या मताइतकें महत्त्व नसणें साहजिक व योग्यच आहे. याबाबत विद्यापीठाच्या अधिकारी वर्गाकडून निश्चित तत्त्वनिष्ठ अशा मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. ज्या बाबतींत अशा शिक्षकेतर सभासदांच्या मतास विशेष महत्त्व देऊं नये, त्याबाबत तें दिलें जातें व जेथें त्याचा अधिक उपयोग करून घेतां येईल तेथें तो घेतला जात नाहीं, असा अनुभव आहे.

' कोर्टा 'च्या सभांच्या वेळीं याचा प्रत्यय येतो. हिशेब-समितीचे अधिकार काय असावे, 'बी. यू. टी.'वर ' कोर्टा 'चे कांहीं शिक्षकेतर सभासद असावे कीं नाहीं, माध्यम काय असावें, शिक्षकांचा दर्जा काय असावा, यांबद्दल ' कोर्टा 'स कांहीं निर्णय सुचवितां येतात का नाहीं, याबद्दल जो विचारविनिमय ' कोर्टा 'च्या सभांमधून झाला, त्यावरून 'कोर्टा'च्या सभासदांस धड एकहि हक्क नाहीं व म्हटलें तर सगळे आहेत, अशी अवस्था दिसते. या व इतर कांहीं बाबतींत विद्यापीठाचा कायदा कांहीं अंशीं असमाधानकारक आहे. पण त्याची बजावणीही अयोजनापूर्वक ( Haphazard ) होत आहे, असें वाटतें. कारण कायदा कसाहि असला तरी योग्य संकेतां–( conventions )-नीं त्यांतील दोष काढतां येतात व उलट चांगल्या कायद्याचाही विपरीत उपयोग होऊं शकतो ! ' कोर्टा 'तील सभासदांचे ठराव व्यवस्थापक-मंडळास नापसंत असले कीं अनेक वेळां ' पॉइंट्स ऑफ आर्डर ' उपस्थित करून त्यांचें खंडन होतें, हें लक्षांत घेतल्यास वरील परिस्थिति कोणासहि पटेल.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून असा निष्कर्ष निघतो कीं, या विद्यापीठाची योग्य प्रगति व्हावयाची असेल तर, कार्यकर्त्यांनीं खालील गोष्टी अधिक जागरूकपणें लक्षांत ठेवावयास हव्यात : प्रत्यक्ष रचनात्मक कार्य करणें जितकें महत्त्वाचें, तितकेंच अनावश्यक, विवाद्य उपयुक्ततेची व गौण कामें अंगावर न घेणेंहि महत्त्वाचें आहे. विद्यापीठाच्या पहिल्या कांहीं वर्षांत कार्याच्या विस्तारापेक्षां त्याच्या गुणा-( quality )-वर अधिक लक्ष दिलें गेलें पाहिजे. विद्यार्थी व प्राध्यापकवर्ग यांच्यामध्यें अध्ययन, अध्यापन व संशोधन यांबद्दल योग्य निष्ठा उत्पन्न होईल, असें वातावरण निर्माण केलें पाहिजे. पुण्यांत व महाराष्ट्रांत घडलेला शिक्षणाचा इतिहास मनांत बाळगून अस्तित्वांत असलेल्या संस्था व त्यांची वाढ विद्यापीठास विरोधी नसून उपयुक्त आहे व त्यास जिवंत व प्रगतिपर ठेवण्यानेंच विद्यापीठास सर्वप्रकारची मदत सतत मिळेल व जोम येईल, अशी काळजी घेतली पाहिजे. माध्यमाचा प्रश्न, वर्गांतील विद्यार्थ्यांची संख्या, मार्गदर्शनाखालीं स्वाध्याय (Tutorials)–असले मूलभूत प्रश्न सोडविणें लांबणीवर टाकतां कामा नये. सर्वांगीण शास्त्रीय ज्ञानाची उपासना व संशोधन यांतच विद्यापीठाचें साफल्य आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. उच्च ध्येयवादित्व म्हणजे पुढचें पाऊल नीट योग्य दिशेनें टाकणें, दूरच्या अंधुक ताऱ्याबद्दल बाटाघाटी करणें नव्हे; हें जाणून विनयानें पण आत्मविश्वासानें, गाजावाजा न करितां, जनमताच्या हेलकाव्याबरोबर हेलकावे न घेतां कार्य करणें, यांतच आपलें कर्तव्य व विद्यापीठाचें कल्याण आहे, हें ध्यानांत बाळगलें पाहिजे.

पुणें येथील एका घटकमहाविद्यालयांतील आजन्म सेवक व प्राध्यापक, पुणें विद्यापीठाचें ' कोर्ट ' व ' ॲकॅडेमिक कौन्सिल ' यांचा सभासद व आज अनेक वर्षें, इतर अनेक सुशिक्षित महाराष्ट्रीयांप्रमाणें, या विद्यापीठाच्या स्थापनेची व आतां त्याच्या प्रगतीची मनापासून इच्छा करणारी एक व्यक्ति म्हणून मी वरील लेख लिहिला आहे. ' पुणें विद्यापीठाचा कायदा ' विधिमंडळासमोर असतां त्याबद्दल कांहीं सूचना करणारे लेख मीं 'ज्ञानप्रकाशा'त लिहिले होते. परंतु तेव्हांपासून आतांपर्यंत फक्त एक अपवाद सोडल्यास कधींहि विद्यापीठाच्या कार्याबद्दल प्रसिद्धीकरतां असा लेख लिहिला नाहीं. हेतु असा कीं, विद्यापीठाचीं पहिलीं वर्षें साहजिकच संक्रमणावस्थेचीं असणार; तेव्हां त्यांतील कार्याबद्दल सार्वजनिक चर्चा इष्ट नव्हे. एक अपवाद उल्लेखिला तो ' सण्डे न्यूज ' या वर्तमानपत्रांत पुण्याच्या घटकमहाविद्यालयांतील आजीव सेवकावर निष्कारण शिंतोडे उडविणारा एक लेख प्रसिद्ध झाला, त्यास सविस्तर उत्तर त्याच वृत्तपत्रांत दिलें. परंतु अलीकडे कांहीं दिवस विद्यापीठाच्या कार्याबद्दल साधकबाधक चर्चा अनेक ठिकाणीं जबाबदार व्यक्तींकडून होत आहे. त्या चर्चेंत आपल्या अनुभवानें आपणांस सुचत असलेले विचार मांडावे, या हेतूनें वरील विवेचन केलें आहे. विद्यापीठाच्या प्रगतीस अल्पस्वल्प मदत व्हावी हा एकच वरील विवेचनाचा हेतु आहे.

---








डॉ. वि. ना. ढवळे

# विद्यापीठविषयक कांहीं विचार

"... Our word 'University' properly denotes 'a body of teachers and scholars'—nothing less and nothing more. Yet the common conception held of it is that of a building, or of a set of buildings attended by teachers and scholars, and nobody realizes that ... if the buildings were all burned to the ground, the University would still remain."[1]

गेल्या कांहीं वर्षांत हिंदुस्थानांत अनेक नवीं विद्यापीठें स्थापन झालीं व अजूनहि बरींच होण्याचा संभव आहे. हिंदुस्थानासारख्या मोठ्या देशाला विद्यापीठें फार कमी होतीं व त्यांच्या संख्येंत वाढ होणें, हें केव्हांही जरूर होतेंच. पण नवीन विद्यापीठांचें कार्य सुरू झालेलें पाहून जो महत्त्वाचा प्रश्न मनांत येतो, तो असा कीं, केवळ विद्यापीठांची संख्या वाढल्यानें आपल्या देशांतील विद्यापीठांतील शिक्षणाचा दर्जा वाढेल काय ? जुनीं विद्यापीठें ( उदा० मुंबई, मद्रास, कलकत्ता वगैरे--विशेषतः मुंबई ) समाधाकारक नाहींत, ही तक्रार फार जुनी आहे. मुंबईसारखें विद्यापीठ हें केवळ परीक्षा घेणारें व पदव्या देणारें यंत्र आहे असेंहि बहुतेकांचें मत आहे. तेव्हां नव्या विद्यापीठांनीं, विशेषतः स्वातंत्र्योत्तर स्थापन झालेल्या विद्यापीठांनीं, जुन्या विद्यापीठांतील दोष टाळण्याचा प्रयत्न केला आहे का, व केला असल्यास तो सफल झालेला अजून कां दिसत नाहीं, याचा येथें थोडक्यांत विचार करूं. जुनीं विद्यापीठें असमाधानकारक एवढें ठरलें; पण नवीन निघणारीं विद्यापीठें चांगलीं कशीं होतील, हें अजून ठरावयाचें आहे.

विद्यापीठाचें मुख्य कार्य कोणतें, याबद्दल आतां तात्त्विक मतभेद फारसा दिसत नाहीं. विश्वविद्यालयानें-च स्वतः शिक्षण देण्याची व संशोधनाची सोय करावी, हें तत्त्व सर्वांनाच मान्य झाल्यासारखें आहे. पण, विद्यापीठानेंच शिक्षण द्यावें, असें मत व्यक्त करणारे लोक पुष्कळदां विद्यापीठाच्या इमारतीवरच भर देतांना आढळतात, शिक्षणावर नव्हे. विद्यापीठाकडून जर कॉलेजांच्यापेक्षां चांगल्या तऱ्हेचें व वैशिष्ट्यपूर्ण असें शिक्षण देण्याची सोय होणार नसेल तर, विद्यापीठानें शिक्षण द्यावें, असें म्हणण्याचें प्रयोजन काय ? सध्यां तरी विद्यापीठानें दिलेलें शिक्षण म्हणजे विद्यापीठाच्या इमारतींत दिलेलें शिक्षण, एवढाच अर्थ बहुतेकांना मान्य झालेला दिसतो. पण शिक्षणाचा दर्जा सुधारण्यास नवीन इमारतींचा उपयोग विशेष होणार नाहीं. शिवाय विद्यापीठ म्हणजे एकादी इमारत किंवा अनेक इमारती नव्हेत, किंवा केवळ विद्यापीठाचे अधिकारी व विद्यापीठानें नेमलेले शिक्षकहि नव्हेत. विद्यापीठ व कॉलेजें ( किंवा इतर संलग्न संस्था ) हीं अगदीं स्वतंत्र असूं शकतात अशी आपली कल्पना होण्याला कारण मुंबईसारखें विद्यापीठ. एके काळीं शिकारपूर-

---

1 'Redbrick University' by Bruce Truscot ( p. 46. )






कराचीपासून सोलापूर-विजापूरपर्यंत सर्व कॉलेजें मुंबईला जोडलेलीं असल्यानें विद्यापीठ म्हणजे मुंबईतील इमारत असें ठरलें, व तें कांहीं अंशीं खरेंहि होतें ! पण लहान विद्यापीठें निर्माण झाल्यावर असा भेद करणें चूक आहे. विद्यापीठाची खरी कल्पना म्हणजे विद्यार्थी व शिक्षक एकत्र येऊन अध्ययनाची, अध्यापनाची, व संशोधनाची निर्माण झालेली एक अव्याहत परंपरा. अशी परंपरा निर्माण होण्यास व गुरुशिष्यांना परस्परांपासून जास्तींत जास्त फायदा होण्यास सर्वांनीं शक्य तर एकाच ठिकाणीं रहावें हें अर्थातच योग्य. म्हणूनच वसतिगृहयुक्त विद्यापीठा-( Residential University ) चें महत्त्व. पण अशा विद्यापीठांत सुद्धां, कॉलेजांचें स्वतंत्र अस्तित्व, महत्त्व व त्यांची सर्व जुनी परंपरा व वैशिष्ट्यें कायम ठेवून, शिक्षण देतां येतें, हें इंग्लंडमधील कांहीं विद्यापीठांचा इतिहास पाहिल्यास दिसून येतें.

नवीन विद्यापीठांजवळ विशेष पैसा नसल्यानें विद्यापीठांकरितां स्वतंत्र वसाहती निर्माण करणें शक्य नाहीं. शिवाय अशा तऱ्हेचें Residential विद्यापीठ निर्माण करावयाचें ठरल्यास येथील विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित पाहिजे व बाहेरील कॉलेजें जोडून घेऊन परीक्षा घेण्याचा उद्योग त्या विद्यापीठानें करतां कामा नये. ज्या विद्यापीठांत अनेक जुनीं कॉलेजें अंतर्भूत होतात, तेथें तर नवीन वसाहत स्थापन करणें हें अतिशय कठीण काम आहे. कारण त्यामुळें जरी थोडेसे फायदे होतील असें मानलें तरी, पैशाचा विचार केल्यास व जुन्या कॉलेजांच्या परंपरा व ऐतिहासिक महत्त्व लक्षांत घेतल्यास, नवीन वसाहत स्थापन न करणेंच इष्ट असें बहुतेकांचें मत होईल. व नवीन इमारती बांधण्याइतका पैसा नसला तरी विद्यापीठांचें फार अडेल, असें वाटत नाहीं. पण जर शिक्षणाबद्दल नवीन दृष्टिकोन नसेल तर मात्र सर्वच अडेल, व नवीन असें कांहींच होणार नाहीं. विद्यापीठानें थोडेसे लठ्ठ पगाराचे शिक्षक नेमले तरी शिक्षणांत एकदम सुधारणा होणार नाहीं. बहुतेक नवीन निघालेल्या विद्यापीठांतून विद्यापीठानें नेमलेले कांहीं प्राध्यापक असून सामान्यतः सर्व काम पूर्वीच्याच पद्धतीनें कॉलेजांतील गरीब शिक्षकांकडून करून घेण्यांत येतें. हें अर्थात् अपरिहार्य आहे. शिवाय, जर शिक्षणाच्या पद्धतींत मुळींच बदल करावयाचा नसेल तर खरोखरच लायक शिक्षक नेमल्यावर ते विद्यापीठाच्या इमारतींत शिकवतात कीं कॉलेजच्या इमारतींत शिकवतात, विद्यापीठाच्या हुकुमानें शिकवतात कीं कॉलेजच्या, इत्यादि सर्व प्रश्न निरर्थक आहेत. शिक्षणाचा दर्जा सुधारणें, व आपल्या विद्यापीठांतून बाहेर पडणारे विद्यार्थी सुसंस्कृत व स्वतंत्र बुद्धीचे बनविणें याकरितां प्रत्येक विद्यापीठानें स्थलकालपरत्वें नवीन नवीन मार्ग शोधून काढले पाहिजेत, व क्षुल्लक गोष्टींना महत्त्व न देतां शिक्षणाच्या मुख्य मुद्द्यावर लक्ष केंद्रित केलें पाहिजे.

मुंबई, कलकत्ता वगैरे विद्यापीठांचें लंडन विद्यापीठाशीं बरेंच साम्य आहे. नवीन विद्यापीठांना लंडन हा आदर्श मान्य नसल्यानें बहुतेकांचें लक्ष ऑक्सफर्ड व केंब्रिज् येथील जगत्प्रसिद्ध विद्यापीठाकडे लागलेलें आहे. कित्येकदां बोलण्यांत व लिहिण्यांत ' ऑक्सब्रिज् ' ( म्हणजे ऑक्सफर्ड व केंब्रिज् ) हें आपलें ध्येय असल्याचें कांहीं जबाबदार लोक सांगतात. तें ध्येय प्राप्त होण्याच्या मार्गांत किती अडचणी आहेत, हें स्पष्टपणें समजून घेतल्यास, तें ध्येय असाध्य आहे असें समजून येईल. ऑक्सब्रिज् येथील जुन्या परंपरेचीं भव्य कॉलेजें, जगांतील अतिसमृद्ध अशीं ग्रंथालयें, तेथील सुप्रसिद्ध ' ट्युटोरियल सिस्टिम् ', विद्यार्थी व शिक्षक यांचे परस्पर संबंध, तेथील सामुदायिक जीवन व एकंदर वातावरण—या व इतर गोष्टी सर्वांनाच आदर्श वाटतात. पण यांपैकीं कोणत्या गोष्टी आपणांस एकदम निर्माण करतां येतील ? ग्रंथालयें निर्माण करणें फारसें कठिण नाहीं. फक्त पैसा पाहिजे. पण दुर्दैवानें ग्रंथालयांवर पुरेसा खर्च करण्यास कोणासच सवड नाहीं. इतर सर्व गोष्टी केवळ पैशावर अवलंबून नाहींत. ऑक्सब्रिज् निर्माण करण्याच्या मार्गांतील मुख्य अडचण म्हणजे आपलें दारिद्र्य, असें पुष्कळांना वाटतें. ही अडचण अर्थातच फार मोठी आहे. पण इतरहि अनेक अडचणी आहेच. ऑक्स्फर्डला एकादें कॉलेज स्थापन करण्यासुद्धां कोट्यवधि रुपये








लागतात. नुकतेंच तेथें एका नवीन कॉलेजकरितां एका फ्रेंच गृहस्थानें १५ लाख पौंड दिले तरी त्या कॉलेजला अजून सुरुवात झाली नाहीं ! विद्यापीठाचा दोनतृतीयांश खर्च सरकार करीत असून व मोठमोठ्या देणग्या असूनही ऑक्सफर्डसारख्या विद्यापीठांचे शिक्षणविषयक प्रश्न एकदम सुटत नाहींत. दुसऱ्या महायुद्धानंतर विद्यार्थ्यांची संख्या थोडी वाढल्याबरोबर इतर विद्यापीठांप्रमाणें ऑक्स्ब्रिज् येथेंहि शिक्षणाच्या एकंदर दर्जाबद्दल काळजी सुरू झाली. तात्पर्य, केवळ पैशानें सर्व प्रश्न सुटणार नाहींत.

एक महत्त्वाचा मुद्दा पुष्कळदां विसरला जातो तो हा कीं, इंग्लंडमध्यें सरकार पैसा खर्च करीत असूनहि, व अमेरिकेंत पैसा पाण्याइतका विपुल असूनहि ऑक्स्ब्रिज्चें अनुकरण करण्याचा फारसा कोणी प्रयत्न करीत नाहीं. असें कां? अमेरिकेंत प्रथम विद्यापीठें निघालीं तेव्हां अर्थातच, इंग्लंडमधील दोन विद्यापीठें हाच आदर्श होता. पण हारवर्डसारख्या जुन्या विद्यापीठानेंही तो जुना आदर्श आतां सोडला असून नवे मार्ग शोधून काढले आहेत. इंग्लंडची परंपरा इतर देशांत निर्माण होणें कठिण आहे. याला मुख्य कारण म्हणजे विद्यापीठांतील शिक्षण हें फक्त थोड्या लोकांकरितांच आहे, हें इंग्लंडमध्यें कित्येक शतकें मान्य झालेलें तत्त्व हें होय. उलट ज्याला जमेल त्यानें पदवी कांहींहि करून घ्यावी हें तत्त्व इतर कांहीं देशांत अनुसरलें जातें. याला सामाजिक, आर्थिक, राजकीय वगैरे अनेक कारणें आहेत, हें मान्य केलें पाहिजे. पण जोंपर्यंत तीं कारणें दूर होत नाहींत तोंपर्यंत कोठेंही 'ऑक्स्ब्रिज्' निर्माण होणार नाहीं. ऑक्सफर्ड अगर केंब्रिज् येथें कित्येक शतकें फारच थोड्या लोकांना प्रवेश असे व ज्याला प्रवेश मिळत असे तो अतिशय भाग्यवान् समजला जाई. आतांहि जरी विद्यार्थ्यांची संख्या थोडीशी वाढली असली तरी ग्रेट ब्रिटनमधील मुलाला किंवा मुलीला प्रवेश मिळणें सोपें नाहीं. प्रवेश मिळण्यास विद्यार्थी अतिशय बुद्धिमान् तरी पाहिजे किंवा खानदानी घराण्यांतील अगर खानदानी शाळेंतील तरी पाहिजे.

इंग्लंडच्या बहुजनसमाजाला अशा रीतीनें केलेली निवड अयोग्य वाटत नाहीं. या पद्धतीनें जरी थोडे सामान्य लोक या विद्यापीठांत प्रवेश मिळवतात हें खरें असलें, तरी बहुतेक विद्यार्थी केवळ बौद्धिक कसोटी लावूनच घेतले जातात. म्हणूनच हिंदुस्थानांतील एकाद्या हुषार विद्यार्थ्याला प्रवेश जितक्या लवकर मिळेल, तितका खुद्द ऑक्सफर्ड किंवा केंब्रिज्मधील सामान्य विद्यार्थ्याला मिळणार नाहीं, हें विसरतां कामा नये. तेव्हां ऑक्स्ब्रिज् म्हणजे थोड्या व निवड करून घेतलेल्या विद्यार्थ्यांना अत्यंत महाग असें शिक्षण देणारें विद्यापीठ. विद्यार्थी पारखून घेतलेले असल्यानें व जगांतील प्रसिद्ध विद्वान् लोकांना, वाटेल तितका पैसा खर्च करून व सर्व सोयी करून देऊन, शिक्षण देण्याकरितां नेमल्यानें ऑक्स्ब्रिज्चा दर्जा खालीं जाण्याची भीति नाहीं. हें सर्व खरें असूनहि आतां पुष्कळ विचारी लोक ऑक्स्ब्रिज्चें अनुकरण करूं नये—निदान सर्व बाबतींत तरी—असें मत प्रतिपादूं लागले आहेत. आपल्याकडील विद्यापीठांजवळ सर्व साधनांची अनुकूलता नसल्यानें जगांतील (किंबहुना आपल्या देशांतीलसुद्धां) उत्कृष्ट संशोधक अगर अध्यापक एकत्र येणें कठिण. नवीन विद्यापीठांविषयीं तर बोलावयासच नको. त्याचप्रमाणें कोणत्याहि कारणानें का होईना, पण आज तरी, ज्याला इच्छा आहे, त्याला विद्यापीठाचें शिक्षण द्यावें असें लोकमत आहे. पदवीला असलेलें महत्त्व व इतर शिक्षणसंस्थांचा अभाव यांमुळें जर विद्यापीठांतील विद्यार्थ्यांची संख्या दर वर्षी वाढत गेली तर नवीन विद्यापीठें काढूनहि विशेष उपयोग नाहीं व तीं ऑक्स्ब्रिज् सारखीं करण्याची भाषा हास्यापद आहे ! खुद्द इंग्लंडमध्येंसुद्धां 'रेडब्रिक' (म्हणजे इंग्लंडमधील आधुनिक विद्यापीठें—मँचेस्टर, लीड्स् वगैरे प्रकारचीं) युनिव्हर्सिटी जास्त जास्त पसंत पडूं लागली आहे. यावरून आपण बोध घेतला पाहिजे. आपल्या देशांतील परिस्थिति पाहून कोणताहि एक आदर्श प्रमाण मानतां कामा नये. आपल्या देशांतील विद्यापीठांत ऑक्स्ब्रिज् येथील वातावरण व रेडब्रिकमधील शिक्षणपद्धति यांची योग्य सांगड घातल्यास

बराच फायदा होईल असें वाटतें.[२] विद्यापीठाचें मुख्य कार्य म्हणजे शिक्षण आणि संशोधन. या दोन्ही बाबतींत कोणत्या सुधारणा विशेष खर्च न करतां करणें शक्य आहे, तें पाहूं.

ज्या शिक्षणसंस्थेंत संशोधन होत नाहीं, त्या संस्थेस 'विद्यापीठ' म्हणूंच नये, असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे. या दृष्टीनें पाहिल्यास, आपल्याकडील विद्यापीठें याविषयीं फारच उदासीन आहेत, असें दिसतें. ही गोष्ट राधाकृष्णन् कमिशनच्या रिपोर्टांत स्पष्टपणें मांडली आहे.[३] संशोधनाची परंपरा निर्माण होण्यास पुरेसा पैसा व वेळ हवा; व योग्य वातावरण हवें. पैशाशिवाय संशोधन होतें हा भ्रम आपण आतां टाकला पाहिजे. तेव्हां 'गरीब' विद्यापीठाकडून संशोधनाची अपेक्षाच करूं नये. अर्थात् कोणत्या विषयांत संशोधन करावयाचें आहे यावर बरेंच अवलंबून आहे हें खरें. पण पैसा नसल्यास प्रत्यक्ष स्वतःच्या भाषेबद्दल किंवा वाङ्मयाबद्दल सुद्धां संशोधन नीट होणार नाहीं, याचा प्रत्यक्ष पुरावा आज इंग्लंडमध्यें सांपडेल. सध्यां इंग्लिश वाङ्मयांतील संशोधन इंग्लंडपेक्षां अमेरिकेंत जास्त प्रमाणावर आहे व याचें मुख्य कारण इंग्लंड अमेरिकेच्या मानानें गरीब आहे हें होय, हें मत एका प्रख्यात प्राध्यापकाचें आहे. जुनीं इंग्लिश हस्तलिखितें, दुर्मिळ पुस्तकें, वगैरे सर्व साधनें कोटयवधि डॉलर खर्चून अमेरिका विकत घेते, व इंग्लिश लोकांना तीं पाहण्यास अमेरिकेस जाण्याची पाळी येते ! यावरून पैशाचें महत्त्व वाङ्मयीन संशोधनांतहि किती आहे हें दिसून येईल. शास्त्राविषयीं तर बोलावयासच नको. तेव्हां 'संशोधन' थोडेंफार तरी असावें, असें नवीन विद्यापीठांना वाटल्यास त्यांनीं आपली कुवत ओळखून एकाद्या विषयावरच पैसा केंद्रित करावा. अनेक विषयांचे नुसते प्राध्यापक नेमून फायदा होणार नाहीं. प्रत्येक विद्यापीठानें प्रत्येक विषय शिकवावा किंवा त्यांतील संशोधनाची सोय (नांवापुरती !) करावी, ही कल्पनाच मुळीं बरोबर नाहीं. एक-दोन विषयांवरच लक्ष केंद्रित केल्यास पुष्कळच फायदा होईल, हें उघड आहे.

शिवाय पैशापेक्षांही अत्यंत महत्त्वाच्या अशा एका गोष्टीचा आपल्या विद्यापीठांत अभाव दिसून येतो. ती गोष्ट म्हणजे स्वातंत्र्य. विशेषतः संशोधन करणाऱ्या (अगर ज्यांच्या हातून तें व्हावें असें वाटतें अशा) शिक्षकांस व विद्यार्थ्यांस भरपूर स्वातंत्र्य पाहिजे. 'शिस्त' या नांवाखालीं विद्यापीठाची 'शाळा' बनवण्याकडे आपली प्रवृत्ति आहे. अजून आपणांस स्वातंत्र्याचे फायदेच माहीत नाहींत त्याला आपला नाइलाज आहे ! स्वतंत्र विचार शिस्तीच्या नांवाखालीं दडपून टाकणें व सर्वांना एकाच चाकोरींतून जावयास भाग पाडणें, हा वास्तविक गुन्हा मानावयास पाहिजे. स्वतंत्र बुद्धि वापरण्यास परवानगीच न दिल्यास कोणासही उत्साह वाटणें अगर स्फूर्ति येणें मानसशास्त्रदृष्ट्या अशक्य आहे. विद्यापीठांत (व कॉलेजांत) शाळेचें वातावरण जाणूनबुजून निर्माण केल्यानें सर्वांत जास्त तोटा बुद्धिमान् लोकांचा होईल. कारण एका सुप्रसिद्ध कवीनें म्हटल्याप्रमाणें "There is absolutely no danger for worthy mediocrity"! या शालेय वातावरणावरही 'रेड्ब्रिक युनिव्हर्सिटी' या पुस्तकांत फारच उत्तम टीका आहे. व ती इंग्लंडमधील नवीन (रेडब्रिक) विद्यापीठावर आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे आपल्याकडील विद्यापीठांवर किती कडक टीका करावयास पाहिजे हें उघड होईल. या नवीन विद्यापीठांतून ऑक्स्फर्ड-केंब्रिजचें स्वातंत्र्य नाहीं. म्हणून लेखक म्हणतो :

"Freshmen again are apt to be misled by the superficial similarity between the modern University and the secondary school which leads to

---

२ 'Redbrick University' या पुस्तकांत लेखकानें ऑक्सब्रिज् व रेडब्रिक् यांची तुलना फार मार्मिकपणें केली आहे.

३ पहा : 'Report of the University Education Commission', p. 151 etc.







it. Walking or cycling to the university just as they did at school, they are apt to think of lecture-rooms as class-rooms, of lectures as classes, of professors and lecturers as teachers and of the Vice-Chancellor as a kind of super-Headmaster. ... Too often undergraduates go through the greater part of their course without suspecting that there is more in it than this. "[४]

( लेखकाच्या म्हणण्याचा आशय असा : 'विद्यापीठ आणि दुय्यम शाळा यांमध्यें जें वरवरचें साहश्य दिसतें त्यामुळें विद्यापीठांत येणाऱ्या विद्यार्थ्यांची दिशाभूल होणें शक्य होतें. पूर्वीं शाळेप्रमाणेंच पायीं वा सायकलवर येऊन विद्यापीठांत हजर राहतांना, त्यांची अशीच समजूत राहण्याचा संभव असतो कीं, विद्यापीठांतील व्याख्यानगृहें म्हणजे शाळेच्या खोल्याच, प्राध्यापक म्हणजे शाळांतील शिक्षकच आणि कुलगुरु म्हणजे एक बडे हेडमास्तरच ! यापेक्षां विद्यापीठांत कांहीं जास्त असतें अशी शंकाहि न येतां विद्यार्थी आपला विद्यापीठीय अभ्यासक्रमांतील पुष्कळसा भाग पुरा करीत असतात ! ') लेखक ही धोक्याची सूचना देतांना 'विद्यापीठ व शाळा यांमधील साहश्य वरवरचें ( superficial similarity ) आहे ' असें म्हणतो, हें लक्षांत घेतलें पाहिजे. म्हणजे 'रेडब्रिक' मध्यें सुद्धां खऱ्या विद्यापीठाचें वातावरण असतें, पण तें चटकन् कळून येत नाहीं. आपल्याकडील बहुतेक विद्यापीठांबद्दल लिहितांना 'वरवरचें ( superficial )' हा शब्द गाळलाच पाहिजे !

वरील मुद्द्याचें महत्त्व पुष्कळांना पटणार नाहीं हें उघड आहे. सर्व शिक्षण, विद्यापीठांतील सुद्धां, छडीच्या जोरावर करावें, असेंही मत असणारे लोक असूं शकतील. परंतु शिस्त लावण्याची वरचेवर पाळी येणें, हें कौतुकास्पद आहे, असें मात्र कोणाचें मत असेल, असें वाटत नाहीं. आपल्या विद्यापीठांतून, प्रथम वाटेल ते विद्यार्थी घ्यावयाचे व मागाहून शिस्तीचें स्तोम माजवून कोणालाहि स्वातंत्र्य मिळूं द्यावयाचें नाहीं, हा प्रकार सर्वत्र चालू आहे. परदेशांत कित्येक विश्वविद्यालयांतून हजेरी वर्गांत केव्हांही घेत नाहींत. व वाटेल त्या व्याख्यानास विद्यार्थ्यांस बसण्याची मुभा असते. यामुळें कोणाचेंही नुकसान होतें, असें निदान परदेशांत तरी मत नाहीं. हजेरीची अट काढून टाकल्यास विद्यार्थ्यांवर जबाबदारी येते व तो ती नीट ओळखतो.[५] कोणावरहि जबाबदारी टाकण्याची तयारी नसणें, हें अविश्वासाचें निदर्शक आहे. विद्यार्थी व शिक्षक यांवर जास्त विश्वास अधिकाऱ्यांनीं टेवला तर शिक्षणाचा दर्जा खास सुधारेल. पण वर सांगितलेली 'शालेय' कल्पना इतकी दृढ होत चालली आहे कीं, नवीन विद्यापीठांत महत्त्वाची सुधारणा म्हणजे प्रत्येक तासाला हजेरी ! पूर्वी सामान्यतः दिवसांतून एकदांच हजेरी असे ! अशा रीतीनें विद्यापीठ चालवलें तरच तें चालेल अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे. वास्तविक नवीन विद्यापीठांनीं नवीन प्रयोग कां करून पाहूं नये ? केवळ पूर्वीपेक्षां तासांची संख्या वाढविल्यानें मुलांचा फायदा होतो, हें मानणें चूक आहे. समजा, मुंबई विद्यापीठ एक पुस्तक शिकवण्याकरितां आठवड्यास दोन तास देत असे त्याऐवजीं आतां आठवड्याला चार तास दिले ! यामुळें शिक्षणाचा दर्जा कितपत वाढेल ? टाईमटेबलमधील तास वाढविणें व शिक्षकांचे कामाचे तास वाढविणें या सुधारणा झपाट्यानें होत आहेत, हें खरें आहे. त्याचा परिणाम एवढाच कीं, शिक्षकाला घरीं वाचन करण्यास वेळ फार थोडा मिळेल, व विद्यार्थ्यांना घरीं वाचन करण्याची जरूर आहे, असें कधींही वाटणार नाहीं. कारण सर्व पुस्तक वर्गांत वाचून काढण्याची शिक्षकावर सक्ती आहे, असें

४ 'Redbrick University', pp. 53-54; also cf. p. 141.

५ पहा : 'राधाकृष्णन् रिपोर्ट', पान १०५.

कळल्यावर व वर्गांत भरपूर वेळ असल्यावर विद्यार्थ्यांनें तरी घरीं वाचून आपला वेळ फुकट कां घालवावा? समजा, इंटरपर्यंत शाळेप्रमाणें शिकविलें पाहिजे असें मानलें. तरी तीच पद्धत थेट एम्. ए. पर्यंत वापरावी हें तत्त्व फारच थोड्या विद्यापीठांत मान्य होईल असें वाटतें. एम्. ए. ही सामान्यतः शेवटचीच परीक्षा. त्याहि परीक्षेला जर 'पोर्शन' संपला पाहिजे, 'तास' झाले पाहिजेत, हजेरी पाहिजेच, व 'पोर्शन' कमी झाल्यास जबाबदारी शिक्षकावरच आली पाहिजे, तर विद्यार्थ्यांना व शिक्षकांना विद्यापीठ म्हणजे शाळाच असें वाटलें तर नवल काय? पूर्वी मुंबई विद्यापीठांत एम्. ए.-ला मुळींच 'तास' नसत व थोडीं व्याख्यानें केव्हां तरी होत. त्या वेळीं निदान स्वतःची बुद्धि वापरून विद्यार्थ्याला अभ्यास करावा लागत असे. व तेंच योग्य होतें. सध्यांच्या 'शालेय' पद्धतीचा दुष्परिणाम ताबडतोब दिसूं लागला आहे. एम्. ए. करितां लावलेल्या कांहीं पुस्तकांतील कोणता भाग वाचावा हें विद्यापीठानें सविस्तर जाहीर करावें, असें मत कांहीं विद्यार्थ्यांनीं नुकतेंच व्यक्त केलें! एम्. ए. होऊन जो विद्यार्थी बहुधा शिक्षक किंवा 'प्रोफेसर' (!) म्हणून लगेच काम करूं लागणार, त्याला एकादें पुस्तक स्वतःच्या जबाबदारीवर संपूर्ण वाचणें सुद्धां जड वाटूं लागलें आहे. असें शिकून तयार झालेले लोक 'प्रोफेसर' झाल्यावर संशोधनाची अपेक्षा कां करावी? ही परिस्थिति निर्माण होण्याला कारण मात्र विद्यार्थी नसून विद्यापीठेंच! विद्यार्थ्याला स्वावलंबनाचा मार्ग शिकवला तरी शिक्षणाचें खरें कार्य झालें. त्याऐवजीं शेवटच्या परीक्षेपर्यंत दुसऱ्यावर अवलंबून राहावयास लावल्यानें विद्यार्थ्यांत स्वतंत्र विचार किंवा अभ्यास करण्याची शक्ति येतच नाहीं. इंग्लंडमध्यें बी. ए. ला बसणारे विद्यार्थी सामान्यतः आपल्याकडील विद्यार्थ्यांएवढेच वयानें असतात. पण तेथें कोणताही शिक्षक पुस्तकें वर्गांत वाचीत नाहीं; व 'ट्यूटर' हि ठराविक मार्गानें जाण्यास विद्यार्थ्यांस सांगत नाहीं. आपल्याकडे कोणतीही नवीन सूचना आली कीं 'आपली गोष्ट वेगळी आहे', 'आपल्या देशांत हें होणें शक्य नाहीं' असें ठराविक सांच्यानें उत्तर बहुतेक अधिकारी देण्यास तयार असतात व त्या उत्तरानें पुष्कळांचें समाधानहि होतें. हें उत्तर पुरेसें न वाटल्यास 'परकीय माध्यम' हीहि एक महत्त्वाची सबब आहे. ही अडचण खरी आहे असें मानलें तरी, निदान मराठी शिकविण्यांत तरी आपणांस निरनिराळे प्रयोग करावयाला हरकत नाहीं. त्या विषयापुरतें तरी अधिक स्वातंत्र्य विद्यार्थी व शिक्षक यांना कां देऊं नये?

जी गोष्ट विद्यार्थ्यांची तीच शिक्षकांची. हल्लीं कांहींचें म्हणणें असें आहे कीं, विद्यापीठांतील शिक्षकांना शाळेप्रमाणेंच तास असावेत! बरोबरच आहे. शाळाच जर पुढें चालवावयाची तर तास कमी कां? पण मग 'विद्यापीठ' या शब्दाचा उपयोग (किंवा दुरुपयोग) तरी कशाला? वास्तविक इंग्लंड-अमेरिकेमध्यें ज्याला 'प्रोफेसर' म्हणतात तो शिक्षक कित्येक दिवस तयारी करून एकादें व्याख्यान देतो—म्हणजे वाचून दाखवतो. ५०–६० मिनिटें व्याख्यान देण्यास त्यास कित्येक दिवस तयारी करावी लागते. ऑक्स्फर्ड येथील सुप्रसिद्ध 'प्रोफेसर ऑफ पोएट्री' हा टर्ममधून सामान्यतः एकच व्याख्यान देतो. आपल्याकडील शिक्षक इतक्या उच्च दर्जाचे नाहींत म्हणून त्यांनीं जास्त काम करावें असें मानलें तरी, रोज प्रत्येक शिक्षकाला निदान तीन-चार तास घरीं अभ्यासाला मिळतात कीं नाहीं, हें विद्यापीठानें पाहिलें पाहिजे. कॉलेजमधील शिक्षकांना शिकविण्या-व्यतिरिक्त इतर कामेंहि करावीं लागतात. उदाहरणार्थ, विद्यार्थ्यांच्या खेळांवर सुद्धां लक्ष त्यांनाच ठेवावें लागतें. तेव्हां नवीन विद्यापीठांना सुधारणा करावयाची असेल तर वास्तविक शिक्षकांचें कांहीं काम कमी करून त्यांना वाचन व लेखन करण्यास जास्त वेळ द्यावा. जें प्रत्यक्ष दिसतें तेवढेंच काम, हें मानणें चूक आहे. तसें मानल्यास विचारांत मग्न असलेला संशोधक निरुद्योगी आहे असें मानावें लागेल. ही कामाच्या तासांबद्दलची कल्पना आपल्याकडील शिक्षकांना ज्याप्रमाणें उपद्रव देते त्याप्रमाणें मधूनमधून इतर देशांतील शिक्षकांनाही देते. शाळेंतील शिक्षकांबद्दल (विद्यापीठांतील नव्हे!) लिहितांना सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ बर्ट्रँड रसेल यांनीं आपलें मत स्पष्ट दिलें आहे व तें फार मननीय आहे;






अनुक्रमणिका





प्रा. देवदत्त अ. दाभोळकर

# भारतीय राजकारणावरील अध्यात्माची छाया

जगाचें आध्यात्मिक नेतृत्व भारताकडे असल्याचा दावा अनेक वेळां करण्यांत येतो. हा दावा यथार्थ असो वा नसो. त्याचें विवेचन या ठिकाणीं आपल्याला करावयाचें नाहीं. भारताच्या अंतर्गत राजकीय जीवनांत जी अध्यात्मपर गूढ छाया पडलेली अनेकदां आढळून येतें, तिचा कांहींसा विचार करावा, इतकाच या लेखाचा हेतु आहे.

अध्यात्मविषयक आर्तता ही भारतीयांच्या जीवनांत आज अनेक शतकें मुरून राहिलेली आहे. भारतांत जन्म पावलेल्या हिन्दु, बौद्ध व जैन या तीनहि धर्मांत या वृत्तीची हेतुपुरस्सर जोपासना केली असल्याचें आढळून येतें. पारलौकिक विचारांना किंवा व्यक्तिविषयक मुक्तिसाधनेच्या कल्पनेला इस्लाम धर्मांत स्थान नाहीं असें नाहीं. परंतु त्या धर्माच्या अनुयायांचें ऐतिहासिक कार्य आक्रमक, विजिगीषु अशा स्वरूपाचें झाल्याकारणानें, पराभूत मनोवृत्तींतून निर्माण होणारी अध्यात्मपरता, ऐहिक उदासीनता ही सर्वसामान्य मुस्लीम जनतेच्या अंतः-करणांत कायमचें घर करूं शकली नाहीं. इतर भारतीयांच्या अंतःकरणांत मात्र सुमारें एक हजार वर्षांच्या दास्यकालांत धर्मानें आधींच रुजविलेली ही भावना अधिकच वाढीला लागली. जीवनाच्या भगीपासून दूर जाण्या-( escape ) साठीं उज्ज्वल कलेचा उपयोग एखाद्या कलावन्तानें किंवा कला-रसिकानें करावा त्याप्रमाणेंच प्राचीन उज्ज्वल अध्यात्मविषयक तत्त्वांचा उपयोग या कालांत भार-तांतील अनेक सुसंस्कृत संस्कारक्षम समाजधुरीणांनीं केला. त्या वातावरणांत या वृत्तीचा प्रचारहि साह-जिकपणें व लवकर होऊं शकला, कार्ल् मार्क्स् म्हणतो त्याहून अगदींच वेगळ्या रीतीनें, परंतु त्याहूनहि यथार्थपणें, धर्म हीं अफूची गोळी ठरली.

ब्रिटिशांच्या अमदानींत नव्या जगाशीं, नव्या युगाशीं भारतीयांचा निकट संबंध आला. राजकीय व धार्मिक क्रान्त्यांमुळें पाश्चात्य जगांत तेथील जुनी समाजव्यवस्था, धर्मव्यवस्था व अर्थ-व्यवस्था यांच्यावर आघात होतच होते. औद्योगिक क्रान्तीनें तर जुनी जीवनव्यवस्था बदलणें अगदीं अपरिहार्यच करून टाकलें. जुन्या जीर्ण व्यवस्थे-बरोबरच त्या व्यवस्थेंत महत्त्वाचें स्थान असलेला धर्महि अर्थात् मोडकळीला आला. औद्योगिक समृद्धि, साम्राज्यविस्तार, संशोधनाचें प्रतिक्षणीं वाढत जाणारें क्षितिज, अशा उत्साहप्रद वातावरणांत पाश्चात्यांची मनोवृत्ति ही साहजिकच इहपर बनली व धर्म हा एक शोभेचा, सवडीचा कार्यक्रम होऊन बसला. स्वर्गाला पृथ्वीवर खेंचून आणण्याची उमेद बाळगणाऱ्यांनीं मरणोत्तर स्वर्गाच्या कल्पनेला आपल्या जीवनांत महत्त्वाचें स्थान कां द्यावें ? भारताचा ज्या पाश्चात्य जगाशीं संबंध आला तें जग हें असें होतें.

परंतु भारताच्या जीवनांत मात्र त्यामुळें कांहीं विशेष फरक पडला नाहीं. ज्या राजकीय क्रान्तीमुळें धर्माची जीवनावरील पकड कमी व्हावी अशी राजकीय क्रान्ति भारतांत झाली नव्हती. या उलट भारतांतील राज्यकलहाचें स्वरूप, हिन्दू विरुद्ध मुसलमान, असेंच राहिल्यामुळें त्या त्या धर्माचा पगडा राजकीय संघटनेच्या दृष्टीनेंहि जनतेच्या मनावर अधिकच बसला होता. ज्या अन्तर्गत धार्मिक क्रान्तीमुळें, सुधारणावादामुळें धर्मव्यवस्था आंतून मोडकळीला यावी, अशाहि घटना भारतीय इतिहासांत










अनुक्रमणिका

" What makes obedience seem necessary in schools is the large classes and overworked teachers demanded by a false economy. Those who have no experience of teaching are incapable of imagining the expense of spirit entailed by any really living instruction. They think that teachers can reasonably be expected to work as many hours as bank clerks. Intense fatigue and irritable nerves are the result, and an absolute necessity of performing the day's task mechanically. "

(त्यांच्या म्हणण्याचा आशय असा : 'शाळांमधून आज्ञाधारकपणा आवश्यक समजला जातो. याचें कारण खोट्या काटकसरीच्या कल्पनांमुळें ठेवावे लागणारे मोठे वर्ग व त्या कामाखालीं भरडून निघणारे शिक्षक. ज्यांना शिक्षणाचा अनुभव नाहीं त्यांना, खरें जिवंत शिक्षण द्यायचें म्हणजे मानसिक शक्ति किती खर्च होते, याची कल्पनाहि करतां येणार नाहीं. त्यांना वाटतें कीं, शिक्षकांनीं बँकेतील कारकुनाप्रमाणें इतके तास काम करावें ! याचा परिणाम शेवटीं अतिश्रम, चिडचिडेपणा, रोजचें काम केवळ यांत्रिकपणें करणें, हा होतो,)— सामान्य विचारसरणींतील दोष अशा रीतीनें दाखवून रसेल यांनीं जो निष्कर्ष काढला आहे तो तर फारच महत्त्वाचा आहे. त्यांचें म्हणणें असें : "Discipline, as it exists in Schools, is very largely an evil." ( 'हल्लीं शाळांतून असणारी शिस्त बव्हंशीं अनिष्ट आहे' ). विद्यापीठांचे अधिकारी शिक्षकांच्या कामाचें मोजमाप अजूनहि चुकीचें करतात हें राधाकृष्णन् रिपोर्टावरूनही दिसून येतें. " It must be remembered that lecturing is not the only duty of the teacher." (पान ८१) हें या रिपोर्टांत मुद्दाम नमूद करावें लागलें आहे !

वर उल्लेख केलेल्या कांहीं सामान्य वाटणाऱ्या मुद्दयांवरून हें लक्षांत येईल कीं अजून आपला दृष्टिकोन जुनाच आहे व शिक्षणपद्धतीहि जुन्याच आहेत. थोड्याफार सुधारणा करण्याचा प्रयत्न म्हणजे कांहीं ठिकाणीं सुरू केलेली 'ट्युटोरिअल'ची पद्धत. त्याविषयीं येथें चर्चा करणें शक्य नाहीं. कारण 'ट्युटोरिअल सिस्टिम्'बद्दल बोलतांना एकंदर शिक्षणपद्धतींतील सर्वच तपशीलाचा विचार करावा लागेल. त्यासाठीं स्वतंत्र लेखच हवा. पण शिक्षणपद्धति कोणती असावी यापेक्षां शिक्षक, विद्यार्थी व विद्यापीठ यांचे संबंध कसे असावेत याला जास्त महत्त्व आहे. ते संबंध जर जुन्याच पद्धतीचे असतील, तर 'सामुदायिक जीवन', 'खेळीमेळीचें वातावरण', 'विद्यापीठांतील वातावरण' ह्याहि शब्दांना फारसा अर्थ राहणार नाहीं. शाळा व विद्यापीठ यांतील महत्त्वाचा फरक म्हणजे विद्यापीठांत येणारे सर्व विद्यार्थी जबाबदार व ज्ञानलालसा असलेले आहेत, असें मानलें पाहिजे. व तशी परिस्थिति निर्माण करण्याकरितां शिक्षणाचा व परीक्षांचा दर्जा वाढवून पदवी मिळणें, हें सध्यांपेक्षां कठिण व्हावयास पाहिजे. वास्तविक अनेक महत्त्वाचीं कामें अशीं आहेत, कीं त्यांना सर्वसामान्य पदवीपेक्षां वेगळ्या तऱ्हेचें शिक्षण पाहिजे. पदवीचें महत्त्व कमी झालें म्हणजे आपोआपच विद्यापीठांचा दर्जा सुधारेल. आज पदवी इतकी स्वस्त असूनहि दरवर्षी शेंकडों लोक नापास होऊन आपला पैसा व वेळ फुकट घालवतात. ही उधळपट्टी थांबविण्याचा खरा मार्ग म्हणजे विद्यापीठाच्या शिक्षणाची सर्वांना जरूर नाहीं, हें लोकांना पटवून दिलें पाहिजे. हें सर्व होईपर्यंत वाटल्यास जुन्या विद्यापीठांनीं ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें पदव्या द्याव्या व नव्या विद्यापीठांनीं आपला स्वतंत्र मार्ग आंखून खरे विद्वान् व संशोधक निर्माण करावेत. उच्च शिक्षण सर्वांना मिळावें या हेतूनें विद्यापीठांनीं निदान आपला दर्जा मुद्दाम कमी करूं नये. तसें केल्यास 'उच्च' शिक्षण याला अर्थच उरणार नाहीं. ही अप्रिय परंतु परिणामीं हितकर गोष्ट पुष्कळ देशांत मान्य केली गेली आहे. ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या रजिस्ट्रारनें नुकतीच ऑस्ट्रेलियांतील विद्यापीठांची पाहणी केली. त्याच्या रिपोर्टांतील पुढील

[ पुढील मजकूर पान ५६ वर पहावा ]












सुमारें दोन हजार वर्षांच्या काळांत घडल्या नव्हत्या. बौद्ध व जैन विचारसरणींचे आघात हिन्दु धर्मानें कधींच पचविले होते. ती एक प्राचीन कालची स्मृति होती. धर्मात हस्तक्षेप न करण्याच्या ब्रिटिशांच्या राजकीय धोरणामुळें नव्या राजवटीचाहि प्रत्यक्ष असा परिणाम धर्मव्यवस्थेवर झाला नाहीं. ज्या औद्योगिक क्रान्तीमुळें समाजरचनेचा व त्याबरोबर धर्मकल्पनांचा पाया बदलणें अपरिहार्य होऊन जावें, ती औद्योगिक क्रान्ति भारतांत अगदींच त्रोटक व बऱ्याचशा विपरीत स्वरूपांत आली. पाश्चात्य शिक्षणानें कांहीं नवविचार सुशिक्षितांच्या नवीन पिढीला शिकविले; परंतु त्यांचा प्रचार वरील वातावरणामुळें फार होऊं शकला नाहीं. या वातावरणामुळेंच या नवविचारांनीं प्रेरित झालेल्या नवशिक्षितांच्या अंतःकरणांतील प्रतिक्रिया, प्रक्रिया याहि मर्यादित स्वरूपाच्या अशाच राहिल्या. आत्यंतिक रूढधर्मनिष्ठेपासून निघून कांहीं धर्मसुधारणांच्या टप्प्यापर्यंत ही मंडळी येऊन पोहोंचली, इतकेंच.

पारतंत्र्याची जाणीव असलेला, स्वातंत्र्यासाठीं तळमळणारा असाहि एक जागरूक बुद्धिमंतांचा वर्ग या कालांत अस्तित्वांत होता. संघटितपणें नसली तरी सर्वसामान्यपणें या वर्गाची भावना समाजांत प्रतीत होण्यासारखी होती. या पारतंत्र्याच्या कालांत या वर्गाच्या धर्मविषयक वृत्तीनें एक वेगळीच पलट घेतली. पाश्चात्यांच्या ऐहिक अभ्युदयामुळें व एका पाश्चात्य राष्ट्राच्या राजकीय वर्चस्वामुळें निर्माण झालेल्या न्यूनगंडावरील उतारा म्हणून हा वर्ग भारताच्या अध्यात्मवैभवाचा जयजयकार करूं लागला. स्वामी विवेकानंद यांच्यासारख्या प्रज्ञावान्, भावनाशील प्रचारकाच्या नेतृत्वाखालीं या वृत्तीनें स्थायी स्वरूप धारण केलें. आजहि या अहंकाराचा पगडा आपणां भारतीयांच्या अंतःकरणावर आहे.

गेल्या तीस वर्षांतील भारताच्या राजकीय जीवनाचा इतिहास हा महात्मा गांधींच्या राजकीय नेतृत्वाचा, कर्तृत्वाचा इतिहास आहे. महात्मा गांधींचें नेतृत्व यशस्वी होण्यासाठीं महात्माजींचें असामान्य व्यक्तिमत्त्व कारणीभूत झालें ही गोष्ट जितकी खरी, तितकी भारतांतील एक विशिष्ट परिस्थिति त्यांना सहाय्यभूत झाली, ही गोष्टहि पण खरी आहे. महात्माजींना एखाद्या पाश्चात्य राष्ट्रांत असें एकमेवाद्वितीय नेतृत्वपद मिळालें असतें कीं नाहीं, किंबहुना भारताच्या स्वातंत्र्योत्तर पिढीच्या काळांत भारतांतहि त्यांचें नेतृत्व मान्य झालें असतें कीं नाहीं, हे विचार करण्यासारखे प्रश्न आहेत. या दोनहि प्रश्नांचीं उत्तरें नकारार्थी द्यावी लागतील असें मला वाटतें. आपले मुख्य सिद्धान्त बाजूला टाकून नेतेपणाच्या मानासाठीं नेतृत्व स्वीकारण्याची वृत्ति महात्माजींच्यामध्यें कधींच नव्हती; व त्यांचे मुख्य सिद्धान्त तर एका विशिष्ट देशकालपरिस्थितींतच वापरून पाहण्यासारखे होते. भारतानें त्यांच्या सांगण्यावरून आपल्या हितासाठीं त्या सिद्धान्तांचा उपयोग केला. सत्य, अहिंसा व प्रेम यांविषयींचा आग्रह हा त्या सिद्धान्तांत होता.

या तीन सूत्रांच्या आधारानें भारताचे सत्याग्रह-संग्राम लढविण्यांत आले. या तीन सूत्रांवरील महात्माजींचा आग्रह हा आध्यात्मिक स्वरूपाचा होता. या सूत्रांचा भारतीय जनतेनें केलेला अवलंब हा कांहींसा व्यवहार्थ स्वरूपाचा होता. परंतु व्यवहारासाठीं प्रभावी साधन म्हणून अशा सूत्रांचा अवलंब करणें, हेंहि एका विशिष्ट आध्यात्मिक वृत्तींत वाढलेल्या राष्ट्रांतच शक्य असतें. पाश्चात्य राष्ट्रांतून अशा देशव्यापी सत्याग्रहाची कल्पना करणेंहि अशक्य आहे. भारतीय जनतेच्या वृत्तीमुळें असे सत्याग्रहसंग्राम शक्य झाले व त्याबरोबर या सत्याग्रह-संग्रामामुळें ही वृत्ति अधिकच जोपासली गेली. महात्माजींची अध्यात्मपर जीवनवृत्ति, त्यांचे अध्यात्मनिष्ठ सत्याग्रह-संग्राम—यांचा विलक्षण परिणाम विभूतिपूजक भारतीय जनतेच्या जीवनावर व मनावर झाला, यांत नवल तें कोणतें ?

या वृत्तीचे संभाव्य परिणाम आपण पाहिले पाहिजेत. नजीकचा भविष्यकाळ सोडून दिला तर उत्तरोत्तर भारतीयांच्या जीवनांतील ही अध्यात्मपरता कमीकमीच होत जाईल असाच संभव दिसतो. अंतर्गत वैचारिक मंथनाचा, राजकीय घडामोडींचा, भावी भरघोस औद्योगिक क्रान्तीचा, ऐहिक अभ्युदयाचा असाच परिपाक स्वाभाविक

आहे; इष्टहि आहे. यांत कोणाला कांहीं अनिष्ट दिसेल तें दिसो, परंतु मला तरी यांत कांहीं अनिष्ट असें दिसत नाहीं. अध्यात्मपरता हा कांहीं जीवनाचा एकमेव पाया नव्हे किंवा एकमेव आवश्यक दिलासाहि पण नव्हे. परंतु भारतीय जीवनांतील या बदलत्या भूमिकेविषयीं जागरुक राहून कांहीं काळजी घेणें मात्र जरुरीचें आहे.

भारताचें राजकीय नेतृत्व हें आजवर मुख्यत्वें-करून हिंदू नेत्यांनीं केलें आहे. काँग्रेसमधील हिन्दू नेत्यांनीं आपल्या हिन्दुत्वाचा राजकीय अभिमान कधीं बाळगला नाहीं; परंतु त्यांच्या जीवनावर मात्र या अध्यात्मपर वृत्तीची छाया आढळून येते. संन्यासी असून राजकारणांत भाग घेणारे, राजकारणांतून निवृत्त होऊन संन्यासाकडे वळणारे, कांहीं काळ तरी आध्यात्मिक आर्ततेची उत्कट ओढ लागलेले, किंवा निरन्तर मुमुक्षु वृत्ति बाळगून सामान्य साधक म्हणून विधायक कार्यक्षेत्रांत वावरणारे अनेक नेते उपनेते भारतांत आढळून येतात. किंबहुना या वृत्तीच्या छायेखालीं न आलेले नेतेच कमी आढळतील. ही स्थितिहि एकट्या भारताखेरीज अन्यत्र आढळणार नाहीं. भारतांतहि यानंतर ही स्थिति पालटत जाईल. केवळ ऐहिक कर्तृत्वाच्या, नेतृत्वाच्या मार्गे असणारे लोक उत्तरोत्तर अधिका-धिक पुढें येत जातील असा संभव दिसतो. यांत गैर कांहीं नाहीं. इतर राष्ट्रांत हीच स्थिति आहे. परंतु कर्तृत्वाबरोबर, नेतृत्वगुणांबरोबर, सचाई व स्वार्थत्याग हे गुण जर नेत्यांत नसतील तर, त्याचें नेतृत्व आपमतलबी व राष्ट्रघातक झाल्यावांचून राहणार नाहीं. केवळ अध्यात्मपरतेनेंच हे गुण मिळूं शकतात, असें नव्हे. किंबहुना, नैतिक गुणांच्या संपादनासाठीं व संवर्धनासाठीं अध्यात्मपरतेच्या अधिष्ठानाचें कांहींच कारण नाहीं. परंतु प्रामाणिक अध्यात्मपरतेंत त्या गुणांची जोपासना सुलभपणें होते ही गोष्ट खरी आहे. तिच्या अभावीं इतर दोनच गोष्टींमुळें सचाई व स्वार्थत्याग अशा गुणां-विषयींचा आग्रह प्रभावी होऊं शकतो : एक तर राष्ट्रांतील जनतेची अखंड सुजाण जागरूकता; किंवा एखाद्या विशिष्ट कार्यक्रमाविषयीं, ध्येयाविषयीं (मग तें समाजवाद असो, कम्युनिझम असो किंवा धर्माधिष्ठित राष्ट्रवाद असो, ध्येय कोणतेंहि का असेना, त्या-विषयीं उत्कटता असली कीं पुरें) नेत्याला वाटणारी तळमळ. पहिल्या प्रकारची जागरूकता आपल्या जनतेंत लवकर निर्माण होऊं शकेल असें दिसत नाहीं. दुसऱ्या प्रकारचे निष्ठावंत कार्यकर्ते निरनिराळ्या राज-कीय पक्षांतून आढळतात. परंतु काँग्रेसपक्षांत त्याची आवक कमी होत चालली आहे. तेथें आधीं असलेल्यांचाहि प्रभाव कमी होत आहे. कांहीं काळ तरी काँग्रेसपक्षच सत्तारूढ राहील, हें स्पष्ट असल्यानें या बाबतींत स्वार्थी जनांच्या हातांत नेतृत्व जाण्याचा धोका अगदीं निकडीनें निर्माण झालेला आहे. देशाच्या हिताची चिन्ता करणाऱ्या लोकांनीं, व काँग्रेसच्या मान्यवर वृद्ध नेत्यांनीं या प्रश्नाचा नीट विचार करणें अगत्याचें आहे. आकर्षक क्रांतिकारक कार्यक्रम काँग्रेस जनतेपुढें ठेवील तरच ध्येयवादी लोक आकृष्ट होऊन काँग्रेसची अंतःशुद्धि होऊं शकेल. अल्पसंख्य पक्षांच्या बाबतींत हा धोका कमी असतो. कारण ते पक्ष एका विशिष्ट निष्ठे-वर आधारलेले असतात. बहुमतवाल्या पक्षापासून दूर राहण्यांतच त्यांतील नेत्यांना सुख, संपत्ति व सत्ता यांचा हव्यास सोडण्याची तयारी ठेवावी लागते. पक्षान्तर्गत सत्तेचा लोभ त्यांच्यांत कांहीं अंशीं असेल. परंतु अल्पसंख्य पक्षाच्या बाबतींत एकूण शीलावर वाईट परिणाम होण्याची भीति कमी असते.

याहूनहि अधिक महत्त्वाची गोष्ट जनताकार्यक्रमा-विषयीं लक्षांत घेणें जरूर आहे. जनतेचें राजकीय संघटन धार्मिक भावनेवर आधारतां येतें, ही उघड गोष्ट आहे. मुस्लिम लीगनें या धार्मिक भावनेच्या पायावर आपलें राजकारण उभें केलें; सिद्धीस नेलें. हिन्दुमहासभेनें तसा अयशस्वी प्रयत्न केला. आध्या-त्मिक वृत्तीला धर्मभावनांचा आधार असतो, ही गोष्ट खरी. परंतु धर्माधिष्ठित राजकारणाच्या मार्गे असणाऱ्या भावना त्या ह्या नव्हेत. धर्माधिष्ठित राजकारणच उभें करावयाचें असतें तर, महात्मा गांधींना तें सहज शक्य होतें. हा सुलभ सुकर मार्ग गान्धींजींनीं स्वीकारला नाहीं, ही एक गोष्टदेखील त्यांची अलौकिकता सिद्ध करण्यास पुरेशी आहे. अस्पृश्यांचें राजकारणहि धर्मावर आधारभूत होतें. परंतु उच्चवर्णीय हिन्दूंचा








द्वेष, असें त्याचें प्रतिकारात्मक स्वरूप राहिलें. हिन्दुत्वाचा अभिमान किंवा इस्लामचा अभिमान अशी अभिमानाची आक्रमक वृत्ति त्यांत नव्हती. कारण कुणालाहि कशाहि प्रकारें अभिमान वाटावा असें अस्पृश्यतेंत कांहींच नव्हतें अस्पृश्यांच्या चळवळींत आध्यात्मिकतेचे कांहीं पडसाद पुढेंमागें आलेच तर ते डॉ. आंबेडकरांच्या बौद्धधर्मानुयायी व्यक्तिमत्त्वाच्या प्रतिध्वनीच्या रूपानें येतील तेवढेच. डॉ.आंबेडकरांसारख्या बुद्धिमान् बुद्धिवादी माणसाला अध्यात्मपर बौद्धधर्माविषयीं आत्मीयता वाटावी हा एका दृष्टीनें हिन्दुसंस्कृतीचा पराभव असला तरी अन्य दृष्टीनेंच त्या संस्कृतीनेंच मुरविलेल्या अध्यात्म-वृत्तीचा तो विजय आहे. या वृत्तींतून बौद्धधर्माच्या प्रसाराची कल्पना सर्वकल्याणप्रद म्हणून पुढें यावी हाच, आपण नव्या युगाच्या प्रकाशांत वावरावयास अद्यापि किती असमर्थ आहोंत, याचा पुरावा आहे. जुने प्रश्नच जरी सोडवावयाचे असले तरी ते नव्या युगांत नव्या साधनांनींच सोडविले पाहिजेत.

आर्थिक व राजकीय आघाडीवरहि हा विवेक ठेवणें आवश्यक आहे. या ठिकाणीं मला मुख्यतः सत्याग्रही क्रान्तीच्या कल्पना, सत्याग्रहि समाजवाद, सर्वोदयवाद, संत-राजकारणी ( Philosopher-Kings ) वर्गाच्या हातीं राजसूत्रें ठेवण्याच्या कल्पना व अशांसारख्याच कांहीं भाबड्या आशा अभिप्रेत आहेत. या सर्वांचा पुरस्कार निरनिराळ्या व्यक्तींनीं, निरनिराळ्या काळीं व वेगवेगळ्या प्रमाणांत केला आहे. कांहींनीं आपद्धर्म म्हणून या कल्पनांचा स्वीकार केला आहे; तर कांहींनीं जीवन-धर्म म्हणून त्या अंगीकारिल्या आहेत. या सर्व कल्पनां-तून महात्मा गांधींच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाची छाया व त्यांच्या वैयक्तिक जीवनांत व भारताच्या राष्ट्रीय जीवनांत अखंड अनुस्यूत असलेल्या अध्यात्मपरतेची छाया, याच मुख्यत्वेंकरून आढळून येतात. या छायांच्या रंगतींत अशा प्रकारचा रम्य-मधुर कल्पनाविलास कांहीं काळ रचेलहि. परंतु या दोन्हीहि छाया हळूंहळूं विरणार आहेत. परिस्थितीच वरील कल्पनांचा निरास करील, अशीं चिन्हें आजच दिसत आहेत. महात्माजींचें कार्य ही भारतांतील नव्या युगाची नांदी नसून जुन्या युगाचें भरतवाक्य होतें, असाहि निर्वाळा इतिहास कदाचित् भावी कालांत देईल त्यामुळें महात्माजींच्या कार्याचें महत्त्व कमी होतें, असें नव्हे. परंतु स्वतंत्रपणें विचार करण्याची आपल्यावरील जबाबदारी त्यामुळें वाढते, ही गोष्ट मात्र खरी.

जीवनांत जें मंगल, हितकर असें असतें त्याचा व धर्मभावनेचा किंवा अध्यात्मपरतेचा कांहीं अनिवार्य संबंध असलाच पाहिजे, असें नाहीं. केवळ ऐहिक अभ्युदयाच्या मागें असलेल्या राष्ट्रांनींहि व्यक्तिचारित्र्याचे किंवा राष्ट्रचरिताचे आदर्श निर्माण करून दाखविले आहेत. अध्यात्मपरता, ऐहिक सुखाविषयींची उदासीनता, नेभळी नैतिकता, हीं मध्ययुगीन आहेत. नव्या युगांत त्यांना स्थान नाहीं. परंतु यामुळेंच केवळ नव्या युगांत स्वार्थपरायणतेचें, स्वैराचाराचें अराजक असतें, असें समजण्याचें कारण नाहीं. भारतानें नव्या युगाचें नव्या उत्साहानें स्वागत केलें पाहिजे. ऐहिक अभ्युदयासाठीं प्रयत्न करणाऱ्या इतर अनेक राष्ट्रांचे इतिहास घडले, तसाच भारता-चाहि घडेल. भारताचा ऐतिहासिक वारसा त्यांत कांहीं विशेष फरक करूं शकेल, असें वाटत नाहीं. इतरांच्या चुका टाळून, भारताचें नव्या मार्गानें नवें नेतृत्व करणारे, स्वयंप्रज्ञ, धैर्यवान्, त्यागशील नेते भारताला आज हवे आहेत.

**विद्यापीठविषयक कांहीं विचार** [ पान ५३ वरून पुढें चालूं ]

वाक्यावर आपण पुष्कळच विचार करावयास पाहिजे:

" ... a University education is a costly privilege; and the more advanced it is, the more costly it becomes, not only in money, but what is more important, in the time and energy of teachers. " ६

( ' विद्यापीठीय शिक्षण हा एक मोलाचा मान आहे. तें शिक्षण जितकें अधिक उच्च, तितकें तें अधिक मोलाचें; केवळ आर्थिक दृष्ट्याच नव्हे तर त्यापेक्षांहि अधिक महत्त्वाचा असा जो शिक्षकांचा वेळ व शक्ति त्यांच्या खर्चाच्या दृष्टीनें ! ' )

६ 'Sixth Congress of Universities of the Commonwealth', Oxford.










# सारसंकलन

## लोकशाही आणि व्यक्तिविकास

सातारा येथील सुप्रसिद्ध कार्यकर्ते व तत्त्वचिंतक डॉ. वा. वि. आठल्ये यांच्या वयाला गेल्या ऑगस्ट ( १९५० ) मध्यें ६०. वर्षे पूर्ण झालीं. त्यांनीं आपलें उर्वरित आयुष्य महाराष्ट्रांतील नैतिक व सांस्कृतिक समुत्थापनाच्या कार्यांत वेंचण्याचें योजिलें असून तन्निमित्त आपल्या विचारांचा प्रचार करण्यासाठीं ते हल्लीं महाराष्ट्रांत फिरत असतात. त्यांच्या ६१ व्या वाढदिवसाच्या सत्कार-समारंभ-प्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं आपला हा संकल्प, त्या संकल्पामागील पार्श्वभूमि, आपल्या कार्याची दिशा यांचें दिग्दर्शन केलें आहे.

डॉ. आठल्ये यांच्या संकल्पामागील व तदनुसार ते करीत असलेल्या कार्यामागील त्यांची तात्त्विक भूमिका कोणाहि समाजोन्नतीबद्दल कळकळ बाळगणाऱ्याला मननीय वाटेल अशी आहे. त्यांच्या त्या भाषणांतील कांहीं उतारे पुढें दिले आहेत :

" १९०५ सालीं बंगभंगाच्या निमित्तानें निर्माण झालेल्या स्वदेशी व्रताच्या सामान्य चळवळीपासून साहसी क्रांतिकारक चळवळीपर्यंत आणि टिळकांच्या राजकारणापासून गांधींच्या सत्याग्रहापर्यंत विविध राष्ट्रीय आंदोलनांशीं आतांपर्यंतच्या आयुष्यांत माझा संबंध आला व त्यांमध्यें मी यथाशक्ति भाग घेतला. ह्या सर्व आंदोलनांतील उज्ज्वल बाजू मला माहीत आहे. माझ्या जीवनाचा जो अल्पस्वल्प विकास झालेला असेल तो होण्यास ह्या आंदोलनांचा कांहीं हातभार लागलेला आहे व त्याबद्दल मी कृतज्ञहि आहे. परंतु ह्या सर्वांमध्यें मला एक दोष दिसून आला व तो सांगणें मानवहिताच्या दृष्टीनें मला इष्ट वाटतें. तो म्हणजे ह्या सर्व चळवळींना नैतिक अधिष्ठान जसें लाभावयास पाहिजे होतें तसें लाभलें नाहीं. टिळक, लजपतराय, मालवीय, अरविंद घोष व गांधी ह्यांसारख्या कांहीं नेत्यांच्या स्वतःच्या जीवनाला श्रेष्ठ नैतिक अधिष्ठान होतें. तथापि त्यांच्या अनुयायांमध्यें तें निर्माण करण्यास जशी सवड त्यांना मिळावयास पाहिजे होती तशी परिस्थितीनें त्यांना दिली नाहीं. ह्या सर्वांना नैतिक अधिष्ठानाचें महत्त्व खासच कळत होतें व त्याबद्दल ते आपला आग्रह बोलूनहि दाखवीत असत. पण इतरांच्या बाबतींत ते हतबुद्ध असत. ज्या राजकीय पारतंत्र्यामुळें आपली नैतिक, सांस्कृतिक व सर्व तऱ्हांची अवनति झालेली आहे, तें नाहींसें करण्याची सर्वांना कमीअधिक प्रमाणांत घाई झालेली होती व असें होणें स्वाभाविकच होतें. परंतु कांहीं नेत्यांना नैतिक वा सांस्कृतिक अधिष्ठानाचें, ते तोंडानें क्वचित् कांहींहि अनुकूल बोलले असले तरी, महत्त्व वाटत नव्हतें. कारण स्वतःकरतां अथवा इतरांकरतां ते त्याचा फारसा आग्रह धरीत नसत. ह्या अनास्थेचीं कटु फळें आज आपण चाखीत आहोंत.

" हा मोठा दोष आपल्या सार्वजनिक जीवनांत असूनहि आपण अनेक कारणांमुळें राजकीय पारतंत्र्यांतून मुक्त झालों. परंतु नवराष्ट्रनिर्मितीचें कार्य मात्र हा दोष शिल्लक ठेवून कधींच होऊं शकणार नाहीं, इतकेंच काय पण, आपल्या देशाचें स्वातंत्र्य सतत धोक्यांतच राहील, अशी मला साधार भीति वाटते.

" माझ्या अंतःकरणांत राजकीय वा इतर कोणताहि पक्षाभिनिवेश नाहीं. अनुभवानें, श्रद्धेनें नव्हे, सर्वत्र भरलेल्या विश्वशक्तीच्या चांगुलपणावर माझा विश्वास आहे. मला तसे लहानमोठे अनेक अनुभव आलेले आहेत. सर्व बळांमध्यें मी आत्मिक बळ श्रेष्ठ मानतों तथापि सर्व बळें--शारीरिक, बौद्धिक व आत्मिक—आपलींच आहेत व त्यांचा योग्य








समन्वय करून व्यक्तिजीवन व समष्टिजीवन यशस्वी होईल व यशस्वी करावें अशा मताचा मी आहे. आपण शुद्ध हेतूनें, सद्भावनेनें व निश्चयानें नैतिक व सांस्कृतिक पुनरुत्थापनाचें कार्य हातीं घेतल्यास विश्वशक्ति आपल्या पाठीशीं उभी राहील याबद्दल मला शंका नाहीं.... ''

'' व्यक्तीची उन्नति व व्यक्ती मिळून झालेल्या समष्टीची उन्नति ह्या भिन्न नाहींत. आत्मोन्नतींतूनच सर्वोन्नति व आत्मोदयांतूनच सर्वोदय होतो. सत्याच्या शोधनाच्या दृष्टीनेंहि व्यक्तिवादाला फार महत्त्व आहे. व्यक्तीच्या स्वतंत्र अस्तित्वांतच व्यक्तिवाद अंतर्भूत आहे. व्यक्तिवादाला महत्त्व नसतें तर विचारस्वातंत्र्य, प्रचारस्वातंत्र्य व व्यक्तीचीं इतर स्वातंत्र्यें यांना कांहींच अर्थ उरला नसता. मानवांचा व इतर जीवांचाहि मूळ स्वभाव वैयक्तिक आहे. सामुदायिकता अथवा सामाजिकता ही सोयीकरतां पतकरली गेलेली आहे आणि ज्या ज्या क्षणीं तिची अनुपयुक्तता व्यक्तीस जाणवूं लागते त्या त्या क्षणीं व्यक्ति वैयक्तिक जीवन घालविण्यास प्रवृत्त होते. आधीं व्यक्ति व मग समष्टि हाच नैसर्गिक क्रम होय. केवळ समष्टीकरतां व्यक्ति ही कल्पना अनैसर्गिक, अयुक्तिक आणि म्हणून भ्रममूलक व मानवी मनांत स्थायीभावास पोंहोचण्यास अपात्र असल्यामुळें ही कल्पना कोणत्याहि धार्मिक, सामाजिक वा राजकीय तत्त्वज्ञानांत प्रतिपादिली गेली तरी ती निरुपयोगी होय.

'' सध्यांचें युग लोकशाहीचें युग आहे. पण आज खरी लोकशाही कोठेंच पहावयास सांपडत नाहीं. जेथें तिचा उगम व विकास झाला तेथेंहि ती विकृत होत चाललेली आहे. ह्याचें कारण व्यक्तिविकासाची तेथें अनेक कारणांनीं झालेली व होणारी उपेक्षा हें होय....

'' व्यक्तिविकासाच्या पोटांत प्रचंड शक्ती सामावलेल्या असतात. अध्यात्मशास्त्र, मानसशास्त्र, समाजशास्त्र, विविध भौतिकशास्त्रें हीं सर्व विकसित व्यक्तींनींच रचलेलीं आहेत. आजपर्यंत मानसशास्त्रवेत्त्यांना अथवा तत्त्ववेत्त्यांना कळून आलेल्या उपजत व तदंतर्गत दुय्यम वृत्तींच्या विकासाची भाषा आपण निरनिराळ्या ग्रंथांमध्यें वाचलेली आहे. पण विवेकानंदांचें चरित्र वाचतांना माझ्या दृष्टोत्पत्तीस त्यांत एक अभिनव कल्पना आली. ती म्हणजे मानवी मनांत येणाऱ्या श्रेष्ठ कल्पनांतून ( ideas मधून ) नवीनच मूलप्रवृत्ती (instincts ) निर्माण करण्याची होय. याचा अर्थ मानवी मनाची ( पूर्वी माहिती नव्हती अशी ) नवीन घटना जन्मास आणणें व एक अभिनव मानसिक युग निर्माण करणें असा होतो. हें अभिनव मानसिक युग निर्माण होवो वा न होवो, जीवनक्रांतीचा अथवा जीवनाच्या नव्या उभारणीचा पाया ह्या व्यक्तींमध्यें बीजरूपानें असलेल्या प्रचंड शक्ती होत, हा सिद्धांत सर्वांनीं समजून घेण्यासारखा आहे.......

'' मानवाच्या आत्मिक घटनेस स्पर्श करूं शकणारे कार्यकर्ते पाहिजे आहेत. अशा व्यक्ती चारित्र्यसंपन्न म्हणून थोड्या व निवडक असणार. ह्या थोड्या व निवडक असल्या तरी या व्यक्तींच्या नैतिक उंचींत जबरदस्त इच्छाशक्ति सामावलेली असते.

'' ह्या निवडकांच्या कार्याचा आधार आत्मिक शक्ति होय. अंतर्बाह्य शुद्धतेनें त्यांना आत्मिक शक्ति प्राप्त होते. ह्या शक्तीच्या प्राप्तीनें त्यांच्या बुद्धींत अपूर्व ओज निर्माण होतें आणि त्यांचें ज्ञान व स्मरण दोन्हींहि विलक्षण वाढतात.

'' गौतमबुद्धाच्या काळीं आणि तत्पूर्वींहि अरण्यांत राहणाऱ्या विरक्तांचे जसे श्रमणसंघ होते तसे आजहि आपणास पाहिजे आहेत. बुद्धाच्या ५०० भिक्षूंनीं सर्व आशिया खंडावर आपला प्रभाव पाडला होता. बुद्धाचे संघ व त्या संघाचें कार्य म्हणजे त्या काळचीं बहुजन समाजाचीं तीं फिरतीं गुरुकुलें होत. ''

## प्राचीन व मध्ययुगीन भारतांतील शास्त्रीय विकास

पाश्चात्य शास्त्रीय लेखकांची एक अशी कल्पना झालेली आहे कीं, प्राचीन व मध्ययुगीन भारतांतील शास्त्रीय ज्ञान फारच प्राथमिक अवस्थेंत होतें; त्या मानानें अरबी-ईजिप्शिअन लोकांचें तत्कालीन शास्त्रज्ञान फारच पुढारलेलें होतें व त्यांच्याकडून हिंदूंनीं तें ज्ञान उचललें. त्या उलट प्रतिक्रिया म्हणून आपल्याकडील परंपराभिमानी विद्वानहि 'आमच्याकडे शास्त्रीय दृष्ट्याहि प्रगति झालेली होती' हें सांगतांना हास्यास्पद अतिशयोक्ति करतांना आढळतात. खरा मार्ग












तौलनिक माहिती गोळा करून लोकांपुढें ठेवणें, हा आहे; त्यावर अभिनिवेशानें भाष्यें करणें हा नव्हे. 'नवभारता'नें याच दृष्टीनें मागें एक चर्चात्मक लेख (ऑक्टोबर, '५०, ना. ग. जोशी : "भारतीय संस्कृति व शास्त्रीय दृष्टि") प्रसिद्ध केला होता.—"यूनेस्को' च्या शैक्षणिक समितीच्या सहकार्यानें "नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ् सायन्सेस् ऑफ् इन्डिया" व इतर संस्था यांनीं अशा तऱ्हेचा एक स्तुत्य प्रयत्न नुकताच केला. त्यांनीं 'दक्षिण आशियांतील विज्ञानेतिहास' विषयीं एक 'परिसंवाद' (symposium) तयार करविला. त्यांत प्रामुख्यानें प्राचीन भारतीय शास्त्रज्ञानाविषयींची माहिती तज्ज्ञांकडून अधिकृत निबंध मागवून एकत्र केली. बंगलोरच्या शास्त्रीयविज्ञानपरिषदेच्या निमित्तानें "सायन्स् अॅन्ड कल्चर" मध्यें (जाने. १९५१) श्री. प्रियदारंजन रे यांचा यासंबंधीं एक माहितीपूर्ण लेखहि आला आहे. त्यांत त्यांनीं 'प्राचीन व मध्ययुगीन भारतांतील शास्त्रज्ञान' याविषयींच्या माहितीची रूपरेषा दिली आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें देत आहोंत :

"भारतीय संस्कृतीचा प्राचीनतम उल्लेख मोहेन्जोदरो या सिन्धुसंस्कृतीच्या केंद्रस्थानीं आपणांला आढळतो. ती संस्कृति खरी एतद्देशीय होती. पुढें वेदकालीन संस्कृति येथें स्थापिली गेली. या संस्कृतींत ज्ञानाची मुख्य दिशा धार्मिक (theological) आणि आध्यात्मिक (metaphysical) होती व ब्राह्मणांनीं या बाबतींत खूप प्रगति केली होती, हें वेद व उपनिषदें यांत दिसतें. पण त्याच वैदिक व वैदिकोत्तरकाळाच्या काळांत प्राचीन भारतीयांनीं प्रकृतिविज्ञाना (natural science) च्या अनेक शास्त्रांत चांगलीच प्रगति केलेली होती—विशेषतः खगोलज्योतिष, वैद्यक आणि रसायन यांबाबत खास प्रगति केली होती. शास्त्रांबाबतची सिद्धांतप्रणाली व पद्धति (methodology) यांचाहि निर्देश करणें अवश्य आहे.

"गणितशास्त्रः—गणनांत 'दश' ही संख्या मूलभूत असल्याचीं अनेक उदाहरणें वेदांत आढळतात. $१०^{१८}$ (१० ची अठरावट) दाखविणाऱ्या संज्ञा वारंवार वापरलेल्या आढळतात. संख्यांचीं चिन्हें खिस्तपूर्व ८ व्या शतकांत प्रचारांत होतीं. अशोकाच्या काळीं ब्राह्मी लिपीमुळें त्यांत खूपच सुधारणा झाली. 'शून्या'च्या उपलब्धीनंतर दशांशदर्शक आंकडेहि प्रचारांत येऊं लागले. इ. स. ५९५ सालीं दशांशचिन्हें लिहिलीं गेल्याचा ताम्रपटांतील पुरावा आहे. इतर देशांत त्याचा उपयोग झाला त्यापूर्वीचा हा काळ आहे. शून्यासाठीं ० टिंब च्या चिन्हाचा प्रत्यक्ष उपयोग तुलनेनें मागाहूनचा आहे, पण शून्याची कल्पना निश्चितपणें खिस्तपूर्व २०० सालाच्या सुमारास आढळते.

"ज्योतिषः—पंचांग चांद्र सौरमानाचें असून, महिने व ऋतु माहीत होते. खिस्तपूर्व ३००-२०० मध्यें गुरु, शनि, शुक्र, बुध आणि मंगळ यांसारखे ग्रह माहीत झालेले दिसतात. वेदोत्तर कालांतहि बरींच गणितविषयक भाष्यें निर्माण झालीं. जुन्या 'सूर्यसिद्धान्तां'त ग्रहांच्या विविध गती वर्णिल्या आहेत व ग्रहणांचें गणित करण्याच्या व खगोलशास्त्रीय प्रश्न सोडविण्याच्या पद्धतीहि दिलेल्या आहेत. आर्यभट्ट—(इ. स. ४९९) च्या 'आर्यभट्टीय' ग्रंथांत शास्त्रीय दृष्टि दिसते. त्यानें इतरांकडून सिद्धांत उचललेले नाहींत, तर त्यानें स्वतः त्यांचें गणन केलें. कित्येक खगोलविषयक स्थिरबिंदू (constants) असे आहेत कीं ते ग्रीक वगैरेंच्याहून भिन्न आहेत. अर्थात् त्याच्या खगोलविज्ञानांत ग्रह हे नियमित व एकरूप गतीनें पृथ्वीरूपी मध्यबिंदूभोंवतीं फिरतात असेंच त्यानें मानलेलें आहे. ब्रह्मगुप्तानें (इ. स. ६०० ते ७००) आर्यभट्टाच्या सिद्धांतातील प्रमादस्थळें सुधारलीं. भास्कराचार्यानें (इ. स. ११५०) याचीच पद्धति अनुसरली. यावरून असें दिसतें कीं, प्रारंभिक भारतीय ज्योतिर्विद्या बाबिलोन–किंवा–ग्रीसमधून भारतीयांनीं उचललेली नसून ती त्यांचीच मौलिक सिद्धि आहे.

"अंकगणितः—याला प्राचीन काळी 'पाटीगणित' किंवा 'व्यक्त गणित' म्हणत. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, घन, वर्गमूळ, घनमूळ, अपूर्णांकाचीं गणितें, लघुत्तम साधारण विभाज्य आणि त्रैराशिक ह्या गोष्टी प्राचीन हिंदूंना माहीत होत्या.







"बीजगणितः—याला प्राचीन काळीं 'बीज-गणित', 'कुट्टक-गणित' आणि 'अव्यक्त गणित' म्हणत. बेरीज, वजाबाकी वगैरे बरोबरच linear and quadratic equations of higher degrees, simultaneous quadratic equations, indeterminate equations of the first degree, single and simultaneous, general indeterminate equations of the second degree, solutions of rational triangles and quadrilaterals वगैरे गोष्टीहि यांत होत्या.

"भूमितिः—विविध चतुष्कोणाकृतींची रचना, क्षेत्रफळ व आकार ( volumes ) यांचें combination, transformation आणि application या गोष्टी, वर्तुळाचा वर्ग व त्याचा व्यत्यास ( vice versa ) वगैरे माहीत होतीं. बोधायनानें ( खिस्तपूर्व ८०० वर्षें ) ('शुल्ब'-सिद्धांतामध्यें ? ) समद्विभुज चतुष्कोणांतील समच्छेदकाच्या ( 'डायगोनल 'च्या ) वर्गाचा सिद्धांत मांडला आहे. समभुज चौकोना ( square ) च्या बाबतीतील हाच सिद्धांत वेगळ्या ठिकाणीं मांडला असला, तरी याच सामान्य सिद्धांताची ती एक विशिष्ट घटना आहे. म्हणजे हा सिद्धांत पायथॅगोरसच्या ( खिस्तपूर्व ५४० ) काळापूर्वीं किती तरी शतकें अगोदर येथें माहीत होता ! वेदांमध्यें यज्ञाच्या साठीं निरनिराळ्या पण विशिष्ट आकाराचींच उपकरणें व स्थंडिलें लागत, त्यामुळेंच भूमितीचा अभ्यास वाढला.

"रसायन व वैद्यकः—हीं दोन्हीं जुन्या काळीं परस्परनिगडित होतीं. चरक व सुश्रुत हे आयुर्वेदाचे प्रमुख आचार्य होत; 'अष्टांगहृदया 'चा कर्ता वाग्भटहि तेवढाच मोठा आहे ( इ. स. ६०० ते ७०० ). वैदिक वाङ्मयांत सोनें रुपें, तांबें, लोखंड, शिसें व जस्त यांचा उल्लेख आहे, आयुर्वैदिक कालखंडांतील 'चरकसंहिता' व कौटिल्य-प्रणीत 'अर्थशास्त्र' यांत पितळ, काशें ( ब्रॉंझ ) आणि पारा या धातूंचा उल्लेख आढळतो. उत्खननांत सांपडलेलें तांबें व लोखंड यांचे नमुने, ऐतिहासिक महत्त्वाच्या मूर्ती, स्तंभ, करंडक, तुळया, हत्यारें आणि अवजारें यांवरून प्राचीन भारतीयांची धातुविद्येतील प्रगति सिद्ध होते. यापुढील संक्रमणात्मक कालखंडांत उत्तरोत्तर औषधी वनस्पतीच्या जागीं धातु, धातूंचीं भस्में ( संयोगितें compounds ) आणि खनिज द्रव्यें यांचा उपयोग औषधासाठीं होऊं लागला. हा काल इ. स. ८०० ते ११०० पर्यंतचा म्हणतां येईल. या कालांतच 'वृंद' आणि 'चक्रपाणि' हे नामांकित ग्रंथकार होऊन गेले. त्यांच्याच परिश्रमांमुळें भारतीयांचें रासायनिक ज्ञान खूप वाढलें. त्यांनीं कित्येक धातुजन्य संयोगितें ( भस्में ) कशीं करावींत यांची माहिती दिलेली आहे; विशेषतः ताम्र, पारा व रुपें यांचीं गंधकितें ( sulphides ) यांची माहिती लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तिसरा कालखंड तंत्रविद्येचा होय. तो इ. स. ८०० ते १३०० चा म्हणतां येईल. या काळांत किमयेच्या शोधासाठीं रसायनाची प्रगति चांगली झाली. नागार्जुन हा बौद्धधर्मी आचार्य त्यांत प्रमुख होता. त्यालाच भारतीय सुवर्णरसायनाचा-किमयाविद्ये-( alchemy ) चा आद्य निर्माता समजतात. तो आठव्या शतकांत होऊन गेला. त्याचा 'रसरत्नाकर' ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. किमयेच्या क्षेत्रांतील प्रयोग पतंजलीच्या ( खिस्तपूर्व २ रें शतक ) कालापासून हिंदुस्थानांत चालले होतेच. कित्येक सुवर्ण-रसायना- ( alchemy )-च्या ग्रंथांत डिस्टिलेशन, सब्लिमेशन, अर्क काढणें ( extraction ) वगैरेसाठीं वापरल्या जाणाऱ्या 'यंत्रां'ची, उपकरणांचीं वर्णनें आहेत. पुढच्या इ. स. १३०० ते १५५० च्या कालखंडांत या सर्व माहितीचा प्रत्यय, उपयोग व प्रयोग यांना वाव मिळाला. 'रसरत्नसमुच्चय' नामक ग्रंथांत 'मटेरिया मेडिका', फार्मसी व औषधी यांबद्दलची पद्धतशीरपणें दिलेली खूप माहिती आहे. सुश्रुतानें ( इ. स. २ रें शतक ) कॉस्टिक अल्कलीज् व अल्कलाइन कार्बोनेट्स यांची प्रक्रिया दिलेली आहे, ती इतकी स्पष्ट व सरळ आहे कीं, कोणत्याही क्रमिक पुस्तकांत ती आजच्या कालांतहि खुशाल द्यावी. खनिज अम्लें मात्र या किमयेच्या कालखंडांत फारच उशीरां माहीत झालीं.












" वनस्पति-शास्त्र:—वेदादिक सर्व साहित्यांत भारतीय वनस्पतींचें वर्णन आहे. 'सुश्रुत-संहिता' 'चरक-संहिता' 'कृषिपराशर' 'अमरकोश' 'अग्निपुराण' वगैरे ग्रंथांत यांची माहिती ग्रथित केलेली आहे. त्यांत वनस्पतींचें शारीरविज्ञान, वनस्पतिजीवन-विद्या ( ecolgy ), मॉर्फॉलॉजी, टॅक्सॉनमी, व वनस्पतींची उत्क्रांति यांबद्दलचे विविध उल्लेख आहेत.

"पशुविद्या:–हत्ती, घोडा, बैल आणि इतर पाळीव जनावरांचें जीवन व संगोपन ह्या विषयावरील ग्रंथांच्या अस्तित्वावरून प्राचीन भारतांत पशुविद्याविषयक अभ्यास ( zoological studies ) चालू होता, असें म्हणावें लागतें. मत्स्यविद्याहि फारच पुढारलेली होती, हें आरंभीं उल्लेखिलेल्या परिसंवादांतील एका निबंधांत तपशीलवार स्पष्ट केलेलें आहे. आयुर्वेदाचें क्षेत्र माणसाप्रमाणेंच जनावरांच्या आरोग्याचेंहि होतें, कारण अश्वायुर्वेद व गजायुर्वेद असे आयुर्वेदाचे विभाग आहेत. म्हणजे, पशुरोगविज्ञान ( veterinary science ) सुद्धां प्रगत झालेलें होतें. पांजरपोळाची संस्था पशूंची इस्पितळेंच होत. पांजरपोळ गौतमबुद्धांमुळें सुरू झाले असें म्हणतात... लोकांचें घरगुती, आर्थिक आणि राजकीय जीवन सुस्थितींत राहावें म्हणून करावयाच्या प्रयत्नांतूनच पशुविज्ञान आणि पशुरोगविज्ञान यांची सुरुवात झाली. कारण त्या काळांत माणसांच्या जीवनांशीं शेतकींचीं जनावरें व पशुधन, नांगरींचीं जनावरें, घोडदळ, हस्तिदल, उंटदळ हीं कायमचीं निगडित झालेलीं होतीं.

" शेतकी:—वैदिक काळांत शेतकी बरीचशी सुधारलेली होती. जनावरांचे नांगर आणि कित्येक शेतकीचीं अवजारें, एवढेंच नव्हे तर खतेंसुद्धां, त्या-काळीं माहीत होतीं. मौर्यकाळांत ( खि. पू. ४ थें व ३ रें शतक ) कृषिविद्या हें राज्याचें प्रमुख खातेंच बनलें. शेतकीसाठीं हवामानविषयक निरीक्षण करण्या-साठींहि व्यवस्था केलेली होती. ग्रहांच्या गतीवरून पावसाचें भविष्य वर्तविलें जाऊं लागलें आणि बीं पेरण्याचे हंगाम स्पष्टपणें निर्दिष्ट होऊं लागले. कौटिल्याच्या 'अर्थशास्त्रां'त या शेतकी विभागा-ची तपशीलवार माहिती आहे. इ. स. ५ व्या शतकांतील 'कृषिपराशर' नामक ग्रंथांत प्राचीन भारतांतील कृषिविद्येचें आणि शेतकीशास्त्राचें बरेचसें तपशीलवार वर्णन आलेलें आहे.

## गर्भोपनिषद् व गर्भाची वाढ

केवळ चर्मचक्षूंना जेवढें निरीक्षण करणें शक्य होतें तेवढें करण्याची शक्ति प्राचीन भारतीयांनीं फारच वाढविली होती, याचें एक प्रमाण प्रो. आर. व्ही. शेवैया यांनीं 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस' या संस्थेनें तयार केलेल्या परिसंवादां-तील आपल्या " मानवी गर्भाच्या वाढीविषयीं प्राचीन भारतीय कल्पना" नांवाच्या छोट्या निबंधांत दिलें आहे. प्राचीन काळीं शेंकडों उपनिषदें तयार झालीं. पण त्यांत " गर्भोपनिषदाचा " क्रम मुख्य तेरा उपनिषदांनंतर लगेच लागतो. त्यांत आलेले गर्भाच्या वाढीसंबंधीचे विचार सुश्रुत-चरकांच्या विचाराच्या मानानें फारच पुढारलेले आणि आजच्या काळींहि बरेचसे सयुक्तिक वाटणारे आहेत. त्यांतील मुख्य भाग पुढें दिला आहे :

" डॉ. नीडहॅमच्या मताप्रमाणें प्राचीन भारतीय गर्भविज्ञान सापेक्षतया बरेंच पुढारलेलें होतें. पण चरक-सुश्रुत किंवा भगवद्गीता यांचाच उल्लेख या बाबतींत मुख्यतः केला जातो, आणि गर्भोपनिषदाकडे दुर्लक्ष केलें जातें. वेबरच्या मतें हें 'अथर्वोपनिषदां'तील एक उपनिषद् असावें. उलट कांहीं विद्वान् याचा 'कृष्णयजुर्वेदां'त समावेश करतात. पॉल डॉसेन मात्र याला मुख्य तेरा उपनिषदांनंतर लगेच स्थान देतो. यावरून हें उपनिषद् फार जुनें आहे, हें निश्चित दिसतें.

या उपनिषदांतील गर्भाच्या वाढीबद्दलचे मंत्र पुढीलप्रमाणें आहेत :

'एकरात्रोषितं कललं भवति। सप्तरात्रोषितं बुद्बुदं भवति। अर्धमासान्तरेण पिण्डो भवति। मास-द्वयेन शिरः कुरुते। मासत्रयेण पादप्रदेशो भवति। अथ चतुर्थे मासे गुल्फजठरकटिप्रदेशो भवति। पंचमे मासे पृष्ठवंशो भवति। षष्ठे मासे नासाक्षि-श्रोत्राणि भवन्ति। सप्तमे मासे जीवः संयुक्तो भवति। अष्टमे मासे सर्वसंपूर्णो भवति। नवमे ( मासे ) पीवते ॥'. याचा अर्थ असा: गर्भधारणे-नंतर पहिल्या रात्रीच्या काळांत गर्भ अर्धवट पातळ








असतो, सात रात्रींत तो 'बुडबुड्यासारखा' होतो; अर्धा महिना झाल्यावर तो पिण्डासारखा म्हणजे वाटोळा होतो; एका महिन्यानंतर तो कठिण होतो; दोन महिन्यांनीं डोकें तयार होतें; तीन महिन्यांनीं पायाचा भाग स्पष्ट होतो. चवथ्या महिन्याला बोफा, पोट आणि कंबर स्पष्ट होते; पांचव्या महिन्याला पाठीचा भाग निराळा होतो, सहाव्या महिन्यांत नाक, डोळे, कान वगैरे चेहऱ्याचे अवयव दिसूं लागतात, सातव्या महिन्याला जीव (चैतन्य) संयुक्त होतो; आठव्या महिन्याला गर्भ सर्वावयवांनीं संपूर्ण होऊन नवव्या महिन्यांत तो पुष्ट होतो.

यांतील 'सातव्या महिन्यांत जीव संयुक्त होतो' या एका विधानावांचून बाकीचीं सर्व विधानें व्यापक अर्थानें आधुनिक गर्भविज्ञानाच्या दृष्टीनेंहि सयुक्तिक वाटणारीं आहेत. 'जीव संयुक्त होतो' हें विधानहि 'गर्भात त्या वेळीं संवेदनात्मक व ज्ञानतंतुविषयक कार्य चालू होतें' अशा अर्थानें सयुक्तिक वाटतें. खरें आश्चर्य हें आहे कीं, चालू काळातहि इतक्या थोड्या दिवसाचा गर्भ निरीक्षणार्थ मिळणें अत्यंत दुर्मिळ असल्यामुळें, इतक्या प्राचीन काळीं शास्त्रज्ञांनीं एवढी बारीक माहिती कशी नमूद केली आणि ततोतंत लागू पडणाऱ्या उदाहरणांच्या व उपमांच्या साहाय्यानें असें बारीक वर्णन कसें केलें! आजच्या शास्त्राला लहानांत लहान गर्भ ११ दिवसांचा प्रत्यक्ष पहावयास मिळाला आहे. १९४२ नंतरच ७॥ दिवसाचा गर्भ प्रत्यक्ष उपलब्ध होऊं शकला.

(स्पर्मिस्ट) पुरुषबीजजंतुवादी आणि (ओव्हिस्ट) स्त्रीबीजांडवादी (Spermist-Ovist) यांच्यांतील आधुनिक वादाच्या पूर्वी अनेक शतकें गर्भोपनिषदानें नमूद केलें आहे कीं, 'शुक्र व शोणित यांच्या संयोगानें गर्भ राहतो.' गर्भोपनिषदांत जुळीं मुलें व इतर अशाच निसर्गविकृतीच्या गोष्टी आणि त्यांची परंपरा यांविषयीं बरेंच लिहिलेलें आहे. पण तें मात्र आजच्या माहितीप्रमाणें सयुक्तिक वाटत नाहीं, आणि बरेचसें केवळ कल्पनेवरून (प्रत्यक्ष माहिती व संख्यात्मक गणित यावरून नव्हे) लिहिलेलें दिसतें.

चरक सुश्रुतांमधील गर्भविषयक ज्ञान अगदींच सामान्य आहे; त्यांच्या मताप्रमाणें स्त्रीबीजांडांतच (ovum किंवा egg मध्यें) वाढलेल्या प्राण्याचे सर्व अवयव असतात; आणि वाढ म्हणजे केवळ तयार असलेली रचना बाहेर व्यक्त होणें, एवढीच क्रिया होय.

या वाढीमागील कार्यकारणसंबंधांत अशी कल्पना होती कीं, 'जीव' हा एक स्वतंत्र तत्त्व असून तोच बीजांडांची वाढ नियत करीत असतो." (अर्थातच आजचें शास्त्र, असें कोणतेंहि निसर्गबाह्य तत्त्व संयुक्त होतें असें मानीत नाहीं.)

## गॉर्कीच्या मृत्यूचें रहस्य

क्रांतीनंतरच्या रशियन जीवनांत मॅक्सिम गॉर्कीचें स्थान फार उच्च होतें. असें म्हणतात कीं, स्टॅलिन ज्याच्या मताबद्दल काळजी बाळगी असा हा एकच पुरुष होता. त्याला प्रथम बोल्शेव्हिक क्रांति पटली नव्हती म्हणून तो अनेक वर्षें इटलींत राहिला होता. पुढें त्याचें मत क्रांतीला अनुकूल झालें व तो रशियाला परतला.

'वर्ल्ड रिव्ह्यू' (डिसें. १९५०) मध्यें जी. एफ्. हडसन यांनीं त्याच्या मृत्यूविषयीं एक विचारप्रवर्तक लेख लिहिला आहे. त्यातून पुढील भाग घेतला आहे :

"मॅक्सिम गॉर्कीच्या चरित्रकारांना त्याच्या मृत्यूच्या तन्हेविषयीं नक्की मत बनवावें लागणार आहे. जून १९३६ मध्यें मृत्यूच्या वेळीं त्याचें हें मरण नैसर्गिक होतें, असें समजलें गेलें; पण १९३८ सालीं जुन्या बोल्शेव्हिकांच्या ज्या तीन भयंकर तपासण्या झाल्या, त्या वेळीं सोव्हियेत गुप्त पोलिसाचा मुख्य यागोडा व दोन डॉक्टर यांनीं असा कबुली जबाब दिला कीं, आपण उजव्या व ट्रॉट्स्की-मताच्या 'सोव्हियेतविरोधी गटा'च्या सूचनेवरून गोर्कीचा 'वैद्यकीय' साधनांनीं खून केला! सोव्हियेतमधील गुन्हेगारांच्या तपासणींत नेहमीच जशी संशयाला मोठी जागा असते, तशी येथेंहि आहे; आणि म्हणूनच क्रांतिपूर्व रशियांतील हा हयातचा मोठा लेखक क्रांतीनंतरच्या काळांत नैसर्गिक रीत्या मरण पावला, कीं त्याचा खरोखरच खून झाला, ही गोष्ट संशयास्पद आहे.

"एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं, क्रेमलिन-मधील पक्षप्रमुख आणि पक्षांतील मुख्य लेखक व

शास्त्रज्ञ यांना डॉक्टरी इलाजहि असूक ठरलेल्या डॉक्टरांकडूनच होत असतो. त्याप्रमाणें मॅक्सिम गॉर्की, त्याचा मुलगा मॅक्सिम पेश्कोव्ह, गुप्त पोलिसांचा (यागोडाच्या पूर्वीचा) मुख्य मेन्झिन्स्की आणि पॉलिट्‌ब्यूरोचा एक सभासद क्यूइबीशेव यांच्यावर इलाज चालू असतां चुकीचा औषधी उपचार करून त्यांना जाणूनबुजून खून केल्याची कबुली दिली गेली. "

" गॉर्कीच्या वजनामुळेंच झीनोवीव्ह वगैरेंचा निकाल करणें कठीण जात होतें. तेव्हां गॉर्कीचाच कांटा काढण्याचा कट यागोडानें पक्षपुढाऱ्याच्याच गुप्त सूचनेवरून केला, व तो साधल्यानंतर ( १९३६ ) लगेच झीनोवीव्ह वगैरेंना फाशांवर लटकावण्यांत आले. पण पुढें यागोडा वगैरे स्वतःच मर्जीतून उतरले व त्यांच्यावरच शस्त्र उलटलें ( १९३७ ). तेव्हां त्यांनाच उडवून लावायला हा खुनाचा गुप्तचुप प्रकार उघड करण्यांत आला. गॉर्कीला दूर करण्यासाठीं यागोडाचा उपयोग केला आणि यागोडाला खतम करण्यासाठीं गॉर्कीच्या खुनाचें रहस्य बाहेर आणलें ! फांसावर जाणारे कम्यूनिस्टहि कार्यासाठीं अवश्य तो कबुलीजबाब देतात, हें प्रसिद्धच आहे. ते तर जाणारेच असतात; व म्हणूनच जे राहणारे असतात त्यांना ' कार्य ' करण्याची संधि ते देत असतात ! ही निष्ठा मात्र केवळ अपूर्व होय "

## समानार्थक शब्द आणि मनोविज्ञान

" दि फॉर्टनाइट्‌ली " नामक नियतकालिकांत ( डिसें. १९५० ) डॉ. लीडिया सिचर यांचा एक लेख आला आहे. लेखिका स्वतः रोगतज्ज्ञ व मानसशास्त्रज्ञ आहे. ' समानार्थक शब्दांमागील मनोविज्ञान ' या लेखांतील म्हणणें थोडक्यांत पुढें दिलें आहे :

" सर्वसामान्यपणें समानार्थक मानलेल्या शब्दांतून मानसशास्त्रीय दृष्टीनें भेदाभेद शोधूं पाहणें म्हणजे एक मोठी धक्का देणारी गोष्ट वाटेल. परंतु व्यक्तींशीं ज्याचा सारखा संबंध येतो अशा मानसशास्त्रीय चिकित्सकाला त्या व्यक्तींच्या भाषेंतून त्यांच्या अंतर्गत जीवनाचा बराच कयास लागतो ; भाषा हें अंतर्गत प्रक्रियांच्या आविष्काराचें जिवंत व गतिमान् वाहनच बनलेलें असतें.

" भाषेबाबत सूक्ष्मसंवेदनात्मक भावना असणें, हें बाह्य वास्तव घटनेशीं आलेल्या सूक्ष्म संबंधाचें निदर्शक असतें ( A sensitive feeling for language is almost an indication of a delicate touch for physical phenomena ). या जगांत व्यक्तीची धडपड आपलें आंतरिक व्यक्तित्व व्यक्त करण्यासाठीं चालते, व त्या जगाशीं त्याचा संबंध शब्द व कृति दोहोंच्या द्वारें येतो. कोणत्याहि मानवी संबंधाचा पाया म्हणजे श्रवण व दृष्टि यांच्या द्वारें व्यक्तींनीं एकमेकांबद्दल उत्पन्न केलेली सहानुभूति हीच होय.

" लोकांबद्दलची जिज्ञासा व भाषेबद्दलची जिज्ञासा या एकमेकांशीं फारच निगडित आहेत. कांहीं व्यक्तींना बोलतांना ज्या अडचणी भासतात त्यांतून त्यांची इतरांशीं संबंध न ठेवण्याची प्रवृत्तीच दिसून येत असते, आणि एखाद्या परकीय भाषेची कामचलाऊ माहितीहि करून घेण्याची कांहींची असमर्थता कित्येक वेळां मज्जातंतूंच्या विकृती—( neurosis )—चें लक्षण असतें. म्हणून, रोगचिकित्सक मानसशास्त्रज्ञाच्या दृष्टीनें तर, हा भाषेंतील व कृतींतील अन्योन्य संबंध फारच महत्त्वाचा आहे.

" Liberty आणि Freedom या शब्दांच्या पर्यायांकडे या दृष्टीनें पाहणें उद्‌बोधक ठरेल. Independence, Licence व Licentiousness सुद्धा वेब्स्टरनें पर्यायाच्या यादींत दिलेले शब्द आहेत...संबंध वातावरणच काय, पण त्या पक्षीकडचें आकाशहि ' फ्रीडम ' व लिबर्टी ' ( ' मुक्तता ' व 'स्वतंत्रता' ) या शब्दांनीं सध्यांइतकें केव्हांच भरून गेलेलें नसेल ! मध्यंतरीं या दोन शब्दांच्या जागीं त्यांचा तिसरा पर्याय 'लायसेन्स' ('निस्तंत्रता' 'बेछूटपणा' ) हा धुमाकूळ घालूं लागला आहे. बेछूटपणा, दुसऱ्यांना गुलाम करणें, त्यांचे हाल करणें, त्यांना मुकें मारणें, त्यांना संकटकाळीं मदत न करणें याबाबतचा ' बेछूटपणा ' बोकाळला आहे; आणि हें सर्व ' फ्रीडम् ' किंवा ' लिबर्टी ' याचा परिणाम नव्हे, तर ' इन्डिपेन्डन्स ' ( अनिर्बंधता ) याचा परिणाम आहे—खरोखर ' इन्डिपेन्डन्स् ' हा ' फ्रीडम् 'चा समानार्थक शब्द नसून त्याच्या विरुद्ध अर्थाचा वाहक बनला आहे.

" ' स्वतंत्रते 'चा ' बेछूटपणां 'त परिणाम व्हावा याचा अर्थच हा कीं, ह्या दोन कल्पना परस्परांत अदलाबदल करतां येण्यासारख्या लवचीक वाटाव्यात अशीच त्या लोकांची मनोरचना असते. ' स्वतंत्रते 'चा अर्थ ' स्वतःचा हक्क स्वतःशीं असणें हा आहे. ' निस्तंत्रते 'चा अर्थ ' हक्क हिरावून घेणें असा होऊं लागला आहे. ' असणें ' यामागील निश्चल निष्क्रियता ( static passivity ) आणि ' घेणें ' यामागील गतिमान् आक्रमण ( dynamic aggression ) या गोष्टी भिन्न आहेत.......

" ' अनिर्बंधता ' किंवा ' अ-परावलंबित्व ' ( Independence ) याचीहि अशीच विकृति झाली आहे. व्यक्तीचा साकल्यपूर्ण विकास (integration) म्हणजे व्यक्तिबाह्य विश्वाशीं त्याचा होणारा सुसंवादपूर्ण संयोग होय. व्यक्ति व विश्व हे दोन्ही अविभाज्य असे एकरूप घटक आहेत. पण यामुळेंच ' Independence ' ( अ-परावलंबित्व ) ' मुक्तते 'च्या विरुद्धार्थक बनतें. या अर्थानें ' इन्डिपेन्डेन्स ' म्हणजे ' एकटें ' असणें, फक्त स्वतःशींच संबद्ध असणें, असें ठरतें; आणि बाह्य व मानसिक संबंधांना वगळण्याकडे प्रवृत्ति होते. आपल्या काळचें घोषवाक्य ' इन्डिपेन्डन्स ' असून त्यामुळेंच आपली सध्यांची आणीबाणीची वेळ आली आहे. मज्जाविकृति झालेल्या प्रत्येक व्यक्तीची ' वेगळें ' राहण्याची वृत्तीच अनेक पट वाढून त्यांतूनच ' अलगपणा 'ची अशी भावना निर्माण झाली आहे कीं, जणूं या जगाशीं आपणांला कांहींच करावयाचें नाहीं. प्रवृत्तीचा मानसिक व सामाजिक परिणाम काय होतो, तें लक्षांत न घेतांच लोक आपल्या ' लिबर्टी ' चें, स्वाधीनतेचें रक्षण 'इन्डिपेन्डन्स'नें करूं पाहतात.

" यांतील चूकहि ' मालकीचें असणें ' आणि ' स्वावलंबी असणें ' ( having and being ) यामधील गोंधळामुळेंच उत्पन्न होते. खरें ' इन्डिपेन्डन्स ' म्हणजे एखादी मालकी मिळविणें नव्हे, तर व्यक्तीनें आपली अंतर्गत निर्मिति करणें होय, व त्यासाठीं ' स्वावलंबित्व ' अत्यंत अवश्य असतें. केवळ स्वावलंबी माणूसच जीवनावर विश्वास ठेवून धैर्यानें वागूं शकतो. त्याला अपयशाची भीति वाटत नाहीं. तो यशासाठीं हपापलेला नसतो. त्याला स्वत्वाची परिपूर्ति करावयाची असते व तें काम त्याला इतरांच्या सहकार्यानें व अन्योन्य-आश्रया-( interdependence )नें करावयाचें असतें.

" मानवी जीवनांतील बरेंचसें दुःख हें केवळ शब्दांनीं कूटप्रश्न सोडवावयाच्या हट्टामुळें उत्पन्न होतें. पण केवळ शब्दांनीं आजच्या विसंवादाचा सुसंवाद होणें अशक्य आहे. लोकांना ' लिबर्टी ' देऊन त्यांना बंधमुक्त करतां येईल, पण त्यांना ' फ्रीडम ' देतां येणार नाहीं. ' फ्रीडम् 'ची प्राप्ति प्रत्येकानें आपल्या वैयक्तिक व सामाजिक आत्मविकासानें करून घ्यावयाची आहे.

" स्वातंत्र्य हें स्वतःप्रमाणेंच सर्वांचेंहि आहे; तें जगाच्या संबंधांवर अवलंबून आहे, याची जाणीव लोकांच्या मनांत नसते. वैयक्तिक सामर्थ्यावरील गैरविश्वास, मनाची संकुचितता आणि आपल्या हीन गंडामुळें उत्पन्न झालेले पूर्वग्रह यांजपासून आपण जोंवर मुक्त झालों नाहीं, तोंवर मानवजातीला अधिकाधिक रक्तपातच पाहावा लागेल. पण तलवारीच्या बळावर खरी गुलामी नाहींशी होणार नाहीं, किंवा इतर ऐहिक साधनांनींसुद्धां 'स्वतंत्रता' सुरक्षित ठेवतां येणार नाहीं; खऱ्या 'मुक्त' लोकांच्या क्रियाशीलतेनें शांतिशाली जग निर्माण करतां येईल. "








## आमचें महत्त्वाचें आगामी प्रकाशन

युरोपीय विद्वानांनीं प्रशंसिलेला

पं. जवाहरलाल नेहरू यांचा अद्वितीय ग्रंथ

# जागतिक इतिहासाचें ओझरतें दर्शन

"Glimpses Of World History"

या पुस्तकाचा अधिकृत व सुबोध अनुवाद

खंड १ ते ४

मधून लवकरच प्रकाशित होत आहे.

प्रत्येक खंड डेमी साइजमधील सुमारें ४०० पृष्ठांचा होणार असून

चार खंडांची मिळून एकूण पृष्ठें १६०० च्या वर.

५० नकाशे आणि संपूर्ण सूचि यांसह.

एवढा विस्तृत आणि सांगोपांग

असा मराठी भाषेंतील पहिलाच इतिहास-ग्रंथ

उत्कृष्ट छपाई : मजबूत बांधणी : सुंदर बहिरंग

प्रकाशनानंतरची चार खंडांची एकूण किंमत रु. ३०

●

— प्रकाशनपूर्व खास सवलत —

१ ते ४ खंड रु. २० फक्त (सेल्स टॅक्स, पोस्टेज निराळें)

आपल्या प्रतीसाठीं आजच म. ऑ. नें रु. २० पाठवा.

● ● ●

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २

Regd. No. B. 5177






